भारत-इतिहास-संशोधक-मंडळ-ग्रंथमाला. पुस्तक २८ वें.

# इंग्लिश
# ईस्ट इंडिया कंपनीचा
# पेशवे दरबाराशीं
# फारशी पत्रव्यवहार

## मूळ व मराठी रूपांतर

रूपांतरकार
गंगाधरराव नारायणराव मुजुमदार

संपादक व प्रकाशक.
दत्तो वामन पोतदार, बी. ए.
गंगाधरराव नारायणराव मुजुमदार.
चिटणीस, भा. इ. सं. मंडळ पुणे.



विजया दशमी शके १८४५

किंमत रु. ५

# भारत-इतिहास-संशोधक-मंडळ-ग्रंथमाला

वि. सू.—मंडळाचे बहुतेक ग्रंथांस मुंबई व बडोदें सरकारांचा आश्रय आहे.
* अशी खूण केलेले ग्रंथ मुंबई सरकारानें प्राथमिक व दुय्यम शाळांच्या पुस्तकालयांसाठी मंजूर केले आहेत.

| मालांक. | किंमत रु | मालांक. | किंमत. रु. |
|---|---|---|---|
| १ अहवाल ( शके १८३२ ) | ३ | *१२ तृतीयसंमेलनवृत्त (शके १८३७) | ३ |
| २ ,, ( शके १८३३ ) | ५ | *१३ मुकुंद–महाभाष्य (संस्कृत) | ८८ |
| ३ सुबतविचार (रा वि का. राजवाडे) | २ | *१४ ग्रंथराज (दासोपंत) ,, | ८८ |
| ४ वार्षिक इतिवृत्त (शके १८३४) | ५ | *१५ स्फुट प्रकरणें भाग १ ला | ८१२ |
| ५ मराठ्यांच्या इतिहासाची साधनें खंड १२ (रा. राजवाडे) | १८८ | *१६ स्फुट प्रकरणें भाग २ रा | ८१२ |
| *६ प्रथमसंमेलनवृत्त (शके १८३५) | ८१२ | *१७ वार्षिक इतिवृत्त (शके १८३८) | ३ |
| *७ वार्षिक इतिवृत्त (शके १८३५) | ६ | १८ चतुर्थसंमेलनवृत्त (शके १८३८) | ४ |
| *८ द्वितीयसंमेलनवृत्त (शके १८३६) | ३ | *१९ राजवाडे-खंड-स्थलसूची (१८३९) | ४ |
| *९ वार्षिक इतिवृत्त (शके १८३६) | ३ | *२० पंचमसंमेलनवृत्त (शके १८३९) | ३ |
| *१० मराठ्यांच्या इतिहासाची साधनें खं २० (शिवकालीन घराणीं) | ३ | +२१ संशोधनसंग्रह (१८३९) | छा. आहे |
| *११ वार्षिक इतिवृत्त (शके १८३७) | ६ | २२ चंद्रचूड–दफ्तर–कलम १ | ३ |
| भा. इ स म त्रैमासिकः– शके १८४२।४३।४४ प्रत्येकी रु | ३ | २३ महाराष्ट्रसारस्वत ले. रा वि. ल भावे | ६ |
| | | २४ षष्ठसंमेलनवृत्त (१८४०) | ४ |
| | | २५ सप्तमसंमेलनवृत्त (१८४१) | ३ |
| | | २६ संशोधकाची छोटी जंत्री (रा द. वि. आपटे) | ८४ |
| | | २७ प्रदर्शनपरिचय | ८४ |

## मंडळाकडे मिळणारीं इतर पुस्तकें

रा. वासुदेव शास्त्री खरे-कृतः– (१) अधिकारयोग (२) हरिवंशाची बखर–कि. प्रत्येकी ८१०. राजवाडेकृतः–मराठ्यांच्या इतिहासाची साधनें खंड १।५।७।१०।११ किं अनुक्रमे रु २५, ४, ३, २॥, ८६ चांदोरकरकृतः–संतकविकाव्य-सूचिः– कि. रु २ काव्येतिहाससंग्रह व भारतवर्षः– मासिकाचे कांही अंक व प्रकरणें. चित्रेंः– थोरले बाजीराव नऊरंगी कि ८८, पिलाजी जाधवराव व श्री. शिवाजी महाराजांचा होन किं ८॥

टीपः—टपालहशील व बगी व्ही पी. वगैरे खर्च निराळा पडेल घाऊक घेणारांस चांगलें कमिशन देऊं. माहितीपत्रक मागवा

पुणें येथें 'आर्यभूषण' छापखान्यांत अनंत विनायक पटवर्धन यांनी छापिलें व दत्तो वामन पोतदार व गंगाधरराव नारायणराव मुजुमदार यांनी ३१४ सदाशिव पेठ ( भारत–इतिहास–संशोधक–मंडळाचें मंदीर ) येथे प्रसिद्ध केलें.

# चिटणिसांचें निवेदन

भा इ. स. मंडळाच्या ग्रंथमालेंत प्रस्तुतचा २८ वा हा ग्रंथ एका दृष्टीनें अपूर्व होय. या ग्रंथाचे प्रकाशनानं एका अतिशय महत्त्वाच्या कार्याचा उपक्रम मंडळानें केला आहे. महाराष्ट्राचा सर्वांगसुंदर इतिहास जाणण्यासाठीं मराठी साधनावर च केवळ अवलंबून चालणार नाही फारसी, इंग्रजी, हिंदी, फिरंगी, कानडी, मारवाडी, फरांशिस इत्यादि भाषांतील साधने हि प्रकाशित केलीं पाहिजेत व अभ्यासिलीं पाहिजेत. त्यात फारसी ही तर कांही काळ हिंदुस्थानांतली प्रमुख राजभाषा होती आणि तवारिखा, फर्मानें, अखबारा वगैरे शेकडों लिखाणे त्या भाषेंत आहेत ती इतिहासोपयोगी व बहुमोल आहेत. हीं फारसी साधनें शिवकालीन व तत्पूर्वकालीन महाराष्ट्राच्या इतिहासाविषयी तर सर्वस्वी जीवभूत आहेत.

आज सुमारे चाळीस वर्षे महाराष्ट्रीय पंडित स्वदेशेतिहासाची साधनें मोठ्या आस्थेनें, श्रमाने व प्रेमाने प्रकट करीत आहेत परंतु फारसी साधनांचा परामर्ष म्हणण्यासारखा घेणें त्यांजकडून झालें नाही याची कारणे पाहता फारसी साधनें दुर्मिळ होती असे नाही परंतु फारसी जाणणारे आपणांमध्यें च विरळा असत व जे असत त्यांत इतिहासाचे शोकी व लिखिताचे वाचक प्रायः कोणी निघाले नाहीत. मोठा चमत्कार आहे, की शंभर सवाशें वर्षांपूर्वीं घडघड फारसी वाचणारे मराठे, ब्राह्मण या पुण्यात पुष्कळ विद्यमान होते; आणि ही परंपरा बंडुनाना रानड्यांच्या पिढीपर्यंत जीव धरून होती. आजमितीला खुद्द पेशव्यांच्या फारसनवीस घराण्यांत सुद्धा ही विद्या लुप्तप्राय झाली आहे ! स्वराज्य गेलें, तेव्हांच राजकारणाचीं सूत्रें आमचे हातातून गेलीं आणि सूत्रसाधनरूप फारसी भाषा हि अनोळखीची झाली. आतां पुनः अलीफ बेपासून प्रारंभ करावा लागत आहे !

उलट युरोपियन विद्वानांनी मात्र फारसीचें अध्ययन सुरू केले तें यथास्वभाव आजतागायत वर्धमान च ठेविलें आहे. खुद्द पेशवाई अंमल जारी असतांना कुंपिणीच्या सूत्रचालकात पुष्कळांनी अरबी, फारसी इत्यादि भाषांचें अध्ययन चालविले होतें. वॉरन् हेस्टिंग्ज्, क्लाइव्ह प्रभृति मंडळी राजा नवकिसन मुनशी साख्यांच्या साहाय्यानें ही राजकारणी भाषा शिकल्याचा वृत्तांत सुप्रसिद्ध आहे. फेरिस्ता प्रभृति इतिहासकारांचे ग्रंथ, व बाबर बादशाहाचें तुर्की आत्मचरित्र वगैरे नामांकित ग्रंथ इंग्रजीत भाषांतर होऊन गेल्याला एक शतकावर वर्षे लोटली तर आम्ही अजून सदरहू ग्रंथांची भाषांतरें सुद्धा केली नाहीत. खुद्द पेशवाई अमलाचे अखेरीस

आमच्याकडे फारसी वरून मराठीत उतरलेले कित्येक सुंदर ग्रंथ अलीकडे आमचे पाहण्यांत आले आहेत परंतु तो जुना ओघ आटून च गेला.

अलीकडे प्रो जदुनाथ सरकार यांनी फारसी साधनांचा उपयोग करून इतिहास लिहिण्याचा उपक्रम केलेला प्रसिद्ध असून डॉ. खान, बेणीप्रसाद, कानुनगो प्रभृति मंडळीचे प्रयत्न त्या दिशेने होत असून त्यांचे ग्रंथ इंग्रजी ऐतिहासिक वाङ्मय पुष्ट करीत आहेत. परंतु **यां पैकीं कोणी हि अस्सल फारसी साधनें-मूळ-प्रकाशित करीत नाहींत.** निवळ उतारे देऊन अनुमानें बांधून इतिहासरचना करण्याचा उपक्रम शुद्ध शास्त्रीय दृष्टीने गौण च म्हटला पाहिजे. जशीं आपण मराठी साधनें प्रसिद्ध करीत असतो तशीच शुद्ध फारसी साधनें हि अस्सलबरहुकुम तपासून प्रकाशित केल्याशिवाय त्यांची प्रामाण्याप्रामाण्यता ठरून त्यांचा पूर्ण सत्यसाधक उपयोग होऊ शकणार नाही. अस्सल फारसी साधनें प्रकाशित करण्यास प्रारंभ करावा म्हणून मंडळातर्फे प्रो. जदुनाथ सरकार यांनी एक खण्ड काढण्याचें अंगिकारलें आहे पण कांही अडचणीमुळें त्याजकडून हें कार्य अद्यापि उरकलेले नाही. परंतु संशोधकांना फारसी साधनांची उपेक्षा यापुढें करणें फार च घातक वाटल्यावरून आम्हांपैकी **श्री. आबासाहेब मुजुमदार** यांनी ही शाखा काढण्याचें जबाबदारीचें व अवघड कार्य मंडळाच्या हल्लींच्या दुर्बळ सांपत्तिक स्थितींत हि अंगावर घेतलें व तें चिकाटीने चालवून व मुनशी शिराजी व मुनशी अबदुल् अझीझ यांचे साहाय्याने आज चालतें केलें आहे तसा प्रयत्न केला तर **पन्नास हजार फारसी अस्सल** कागद व खेरीज ग्रंथ मंडळानें आज जमा केल्यासारखे च आहेत **श्री पारसनवीस** यांनी या कामीं फार मदत केली आहे व त्यामुळें हें ग्रंथरूप फळ पदरीं पडल्याचें पाहून यापुढें अधिक आत्मीयतेनें ते वाढती मदत करतील अशी खात्री आहे.

फारसी पत्रांचें वाचन किती अवघड व किचकट असतें हें स्वानुभवावाचून प्रत्ययास येणें कठिण आहे त्यांतहि न कळणाऱ्या भाषेत बादशाही थाटानें, मोहोरेदार कागदावर ऐटीत लिहिलेली साधनें पाहून ती मालकांकडून मिळण्यास केवढी पुण्याई खर्चावी लागते, व ती बिनचूक नकलून आणि बिनचूक छापण्यास केवढी खातापात पडते याची ज्यांना थोडी तरी कल्पना येईल त्यांना प्रस्तुत खंडातील दोषांकडे दुर्लक्ष्य करून हा धाडसी, नूतन व आवश्यक उपक्रम केवळ स्वावलंबनानें मंडळानें अंगावर घेऊन रंगारूपाला आणल्याबद्दल मंडळाचे प्रेमपुरस्सर अभिनंदन च करावेंसें वाटेल यांत संदेह नाहीं.

**दत्तो वामन पोतदार,**
**गंगाधरराव नारायणराव मुजुमदार,**
चिटणीस भा. इ. सं. मंडळ.

॥ श्री ॥

# प्रस्तावना

आपल्या या भरतभूमिमध्ये फारशी भाषेचा प्रचार सुमारें शके १२१० पासून सुरू झाला. तो इतका की, पेशवाई अखेरपावेतों सुद्धा फारशी ही एक प्रमुख राजकीय भाषा समजली जात असून, पेशवे व इंग्रज यामधील तहनामेहि मूळ फारशी भाषेतच लिहिलेले आहेत. श्रीशिवाजीमहाराजांच्या पूर्वकालापासूनच अनेक यवन राज्यकर्त्यांच्या अमलामध्यें राजदरबारात उत्तम फारशी लिहिणारे वाचणारे मुनशी व पंडित असत व त्यामार्फतच सर्व आवकजावक फारशी पत्रव्यवहार चाले. इंग्रजांच्या दरबारीहि फारशी इंटरप्रीटर व मुनशी यांच्या मार्फतच पत्रव्यवहार चालत असे. श्रीछत्रपतिमहाराजाच्या व पेशव्यांच्या दरबारीहि उत्तम फारशी जाणणारे ब्राह्मण, कायस्थ व मुसलमान मुनशी अनेक होते.

हिंदुस्थानचा ख'ा इतिहास लिहावयाचा म्हटलें तर या देशावर ज्याच्या ज्यांच्या स्वाऱ्या झाल्या आहेत किंवा जे जे येथे कोणत्या तरि कारणाने आले गेले अथवा ज्याची थोडी फार वसति होऊन आपणाशी अनेक रीतीनें संबंध आलेला आहे व त्यामुळें आपल्या भाषेवर व आचारविचारावर परिणाम झालेला आहे अशा स्वकीय व परकीय कानडी, गुजराथी, तामील, तेलगु मुसलमान, फ्रेंच, पोर्तुगीज् डच्, इंग्रज वगैरे लोकांच्या भाषेचा अभ्यास करून त्यानी स्वभाषेत आपणांसबधी लिहिलेले विचार किंवा हकीकत समजून घेणे अवश्य आहे. येथें मुसलमानाचा सहवास इतराच्या मानानें विशेष झालेला असल्यानें त्यांच्या फारशी भाषेचें ज्ञान प्रथम करून घेऊन त्याच्या ऐतिहासिक कागदपत्रांचा व ग्रंथाचा अभ्यास करून भरतखंडाच्या इतिहासास सत्यस्वरूप शक्य तितकें देणें हें एक कर्तव्य आहे.

मराठ्याचाहि खरा इतिहास लिहिणें झाले तर त्याकरिता फारशी कागदपत्रांचा आधार अवश्य घेतला पाहिजे. शिवपूर्वकालीन व शिवकालीन मराठी कागदपत्रातून फारशी शब्दाचा भरणा अतिशय आढळून येतो. व त्यामुळेंच तत्कालीन मराठी कागदपत्रे वाचतांना वाचणारांस फारशीचे ज्ञान नसल्यास अत्यंत अवघड जाते. भारत इतिहास संशोधक मंडळासारख्या जबाबदार संस्थेनें या दिशेनें जर प्रयत्न केला नाही व त्या त्या भाषेतील ऐतिहासिक साधनें मूळ स्वरूपात पुढें आणली नाहीत तर तो त्या संस्थेस एक मोठा उणेपणा आहे व मराठीतील ऐतिहासिक साधने इतर भाषांच्या ज्ञानापक्षा फारशी भाषेच्या ज्ञानावाचून बाहेर काढणे व्यर्थ समजून मुद्दाम मी सुमारें अडीच तीन वर्षापासून मूळ फारशी ऐतिहासिक साधने वाचता येऊन ती मराठी भाषांतरासह प्रसिद्ध करता यावीत या दृष्टीनें अभ्यासास सुरुवात केली. छापलेला फारशी मजकूर वाचणें सोपें आहे. परंतु

तोच लेखी वाचणें अवघड होतें. फारशी लिपीत अक्षरांच्या खाली व वर एक, दोन, तीन टिंबें ( नुक्ता ) देण्याच्या पद्धतीमुळें व कांहीं अक्षरें मूळ स्वरूपाहून भिन्न स्वरूपांत जोडण्याच्या नियमामुळें व त्यांतहि कांहीं अक्षरांचीं रूपें लुप्तप्राय होतात यामुळें फारशीचें वाचन प्रथम प्रथम नजर बसेपर्यंत त्रासदायक होतें. परंतु जेथें एकाच अक्षराखालीं किंवा वर एक, दोन किंवा तीन टिंबें दिल्यामुळें प्रत्येक वेगळें अक्षर बनतें व जेथें कडव्यां अक्षरांनी लपेटीत लिहिलेलें असतें तेथें त्या टिंबांची जर गाळण उडते तर मग त्याबरोबरच वाचकांचीहि गाळण कां उडू नये ! फारशी भाषेचे तज्ज्ञहि अशा प्रकारच्या हस्तलिखितांपुढें हात टेंकतात. तात्पर्य, फारशी भाषेचें ज्ञान असणें व छापील मजकूर वाचणें हें वेगळें व जुनें फारशी हस्तलिखित उत्तम रीतीनें वाचणें हें वेगळें.

अशा सर्व अडचणी पुढें असतांना सुद्धां फारशीच्या अभ्यासाबरोबरच फारशी ऐतिहासिक साधनें जमा करण्यास सुरवात केली. या कामी कै. रु. नि. आचार्य कालगांवकर व त्याचे विद्यमान चिरंजीव, दतियाचे रा. करमरकर, श्री. भाऊसाहेब तुळशीबागवाले, रा. सदाशिव विष्णु ऊर्फ भाऊसाहेब रानडे, कै. पांडोबा पटवर्धन, ( बऱ्हाणपूरचे श्री. भुसकुटे ) व पेशवे दरबारचे फारसनवीस घराण्यापैकी वंशज श्री. कृष्णराव केशवराव ऊर्फ बाळासाहेब पारसनवीस, श्री. नारायणराव गोविंद पारसनवीस व श्री. बाबूराव पारसनवीस; श्री. बाळासाहेब विचूरकर, महंत दत्तराज महानुभाव, मे० महमद सलाउद्दीन, श्री. तात्यासाहेब फडके, श्री. हणमंतराव ढेरे, वे० सिद्धेश्वरशास्त्री चित्राव वगैरे अनेक सद्गृहस्थांनीं, अनेक फारशी साधनें—ताम्रपट, ग्रंथ, सनदा, फरमानें, पत्रव्यवहार वगैरे मजकडे व मंडळाकडे इतिहासाचे कामाकरितां म्हणून दिली. याबद्दल मी त्या सर्वांचा अत्यंत आभारी आहे.

उपलब्ध फारशी लेखसंग्रहात वेगवेगळ्या विषयांवरील हस्तलिखित ग्रंथ सुमारें १५० असून पत्रें तर अनेक राजे, महाराजे, नबाब, बादशहा, निजाम, हैदर इ. इ. यांची हजारों आहेत. कित्येक सरदारांच्या व दिल्ली दरबाराच्या दिनचर्या फारशीमध्यें सविस्तर लिहिलेल्या आहेत. इतरत्र अनेक ठिकाणी फारशी लिखाण असलेलें केव्हांहि प्रसिद्धीकरणार्थ मिळण्याची खात्री वाटते. परंतु, द्रव्याभावी उपलब्ध व उपलभ्य संग्रहाचा फायदा कसा करून द्यावा ! असो.

आज आपल्यावर राज्य करणारे **इंग्रज सरकार** यांचा व आपला परस्पर संबंध कसकसा घडून आलेला आहे याचा खरा बोध होणें परस्परास अत्यंत इष्ट आहे. याच हेतूने एकंदर पत्रव्यवहारापैकी इंग्रजांची व त्यांचा ज्यांमध्यें उल्लेख आहे अशीं कांहीं दुसऱ्यांचीहि पत्रें निवडून काढून त्यांचें मराठीत भाषांतर मंडळाचे वेतनी मुनशी शेख अबदुल अझीज, महाराष्ट्र एज्युकेशन सोसायटीच्या हायस्कुलांतील फारशी मास्तर, यांच्या साहाय्यानें मीं केलेलें आहे. कोणत्याहि एका भाषेंतील मजकूर दुसऱ्या भाषेंत हुबेहुब तसाच उत्तरविणे फार कठीण आहे. त्यांतल्या त्यांत फारशी

भाषेंत ' मिश्या मूठभर व दाढी हातभर ' याप्रमाणें मूळ मुख्य मजकूर अगदींच थोडा असून अलंकारिक शब्दयुक्त अल्काब, मायने व प्रासाकरितां एकार्थी शब्दांची रेलचेल, यामुळें भाषांतर यथार्थ करण्यास फार अडचण होते म्हणून सोबतच्या भाषांतरात बऱ्याच ठिकाणीं मूळ फारशी अलंकारिक मायन्यांचें भाषांतर केलेलें नाही. मुद्यापुरता मजकूर मात्र मुळींच सोडलेला नसून भाषांतर शक्य तिनकें मुळाला धरून परंतु मराठी भाषेला साजेलसें केलेलें आहे.

सदर खंडात १४१ पत्रे दिली आहेत. ती सर्व संगतवार मजकुराची नसल्यामुळे व कालाच्या दृष्टीनेहि मध्यें बरीच खड असल्यामुळें सदर पत्रांचा संगतवार सारांश किंवा त्रोटक हकीकत येथे देता येत नाही. फक्त त्यांतील काही मुद्याचे टांचण पत्रांकासह खाली देत आहे.

१. इंग्रज व पेशवेदरबार याजमधील परस्पर स्नेह, प्रेम व एकी यांबद्दल बहुतेक प्रत्येक पत्रातून ओतप्रोत उल्लेख आहेत.

२. अधिकारसंपादन, बदली, नजरनजराणे व परस्पर अभिनंदन. पत्रांक– ३, १६, १८, ५०,५५,५६, ५७, ६०, ७४, ८१, ८३, ८७, ८९, १०८, ११०, १११, ११२, ११३, ११५, ११८, ११९, १२२, १२५.
सदर पत्रांपैकी नजराण्यासंबधी ५५, ८१, व ८९ ही पत्रे वाचनीय आहेत.

३. विल्यम टेलर यांची पेशव्यांचे पदरी रहाण्याची उत्कट इच्छा. ४

४. श्री. राघोबादादास लिहिलेलें पत्र १७ वाचनीय आहे.

५. जहाजे व मचवे यांबद्दल तक्रारी – ४०, ४६, ७९।७८, ८६.

६. बाणकोटचें गरम पाणी. ४७.

८. श्री. राघोबादादांनी इंग्रजांकडे गहाण ठेविलेलें सहा लाख पचवीस हजार रुपये किंमतीचें जवाहीर ६१, ६४.

८. गुप्त सांकेतिक लिपी. ७६.

९. श्रीक्षेत्रप्रयाग येथील यात्रेकरूंवरील कर. ९३.

१०. फ्रान्सची राज्यक्रांती व तिचा हिंदुस्थानांत परिणाम. १०९.

११. सुरत बदराच्या चौथाई बद्दल. ४६, ५८, ५९, ७१.

१२. हैदर व टिपुसुलतान याशीं लढाई. ३१, ३२, ३३, ७३, ९०, ९२, ९४, ९५, ९६, ९७, ९८, ९९, १०१, १०२, १०३, १०४, १०५, १३३.१४०

१३. लखनौचे नबाब – ११४, १२०, १२१.

१४. खर्ड्याच्या लढाईस अनुलक्षून. ११६,११७.

१५. सातान्याचे महाराजांस लिहिलेली पत्रें – १२७, १२८.

१६. डच् लोकांची पत्र – १३१, १३२.

१७. इतर किरकोळ, खलबते, **कामकाज**, हालचाली वगैरे – ४, ५, ६, ७, ९, १०, १४, १५, १९, २१ ते २७, ३०, ३१, ३२, ३६, ३७, ३९, ४९, ५०, ५२, ६५, ६६, ६७, ७१, ७२, ७७, ८०, ८२, ८५, ९०, ९४, ६०

१८. वॉरन् हेस्टिंग्जचीं पत्रें – १९, २६, २७, ३० श्री० राघोबा दादा व मुंबई गव्हर्नर यासंबधी.

१९. वेलेस्लीचें पत्र – "हिंदुस्थान व दखन या देशातील सर्व रयतेस सुख व आराम मिळावा हें नेहेमी आमचे नजरेपुढे ध्येय आहे" १२३.

भा. इ. स मंडळाने प्रोफेसर जदुनाथ सरकार यास एक फारशी साधनांचा खंड मडळाच्या खर्चानें छापून काढण्याबद्दल विनंती केली होती. परंतु ते काम त्याच्या कडून अद्याप घडून आले नाही.

मंडळाची ही फारशी भाषेची शाखा मी पतकरली याचें सर्व श्रेय मुंबई एल्फिन्स्टन् कॉलेजांतील पर्शियन **प्रोफेसर शेख अबदुल कादर शेख सर्फराज, एम्. ए.** यांसच आहे. त्यांचा व माझा परिचय सुमारें १५ वर्षांपासून असून सदर अवधीत ते अनेक वेळा मोठ्या प्रेमाने फारशी साधनांच्या सशोधनाचे कामी मला मनापासून मदत करीत आले आहेत मुनशी शेख अबदुल अझीज याचाहि लाभ त्यानी करून दिला आहे. याबद्दल मी प्रोफेसरसाहेबांचा अत्यत ऋणी आहे.

पत्रांकाच्या प्रारंभी सविस्तर सूची व यादी जोडलेली आहे. सदर सूची व यादी मडळाचे अभिमानी सभासद, रा. शंकरराव जोशी, वाईकर यांनी तयार केली आहे त्याबद्दल मी त्याचा फार आभारी आहे.

ही पुढें दिलेली बहुतेक पत्रे श्री. रा. रा. **बाळासाहेब पारसनवीस** यांनी दिलेली असल्यामुळें हा खंड म्हणजे त्याच्या कृपेचेंच फळ होय, हें मला येथे नमूद करणें जरूर आहे.

या सोबत वाचकांकरितां २४ इंग्रजाच्या पत्रावरील सह्यांचे फोटो व १९ लिफाफ्यांवरील शिक्के पत्रांकासह तपशीलवार दिलेले आहेत.

पत्रें जसजशी मिळाली तसतशी ती छापली आहेत. पत्रांक १२९ ते १४१ ही शेवटी याच कारणामुळे दिलेली आहेत. सदर अस्सल पत्रें भा. इ. स. मडळाच्या प्रदर्शनात मांडली होती व काही पत्रांची भाषांतरें संमेलनात वगैरे वाचलेली आहेत. पत्रावरील तारखा पत्रातून किंवा वरील लिफाफ्यावर जशा आढळल्या तशा दिलेल्या आहेत. पा॥ म्हणजे पोंहोचल्याची तारीख व रा॥ म्हणजे लिहिल्याची किंवा रवाना केल्याची तारीख असे समजावें. काही ठिकाणी पत्रातील मजकुराच्या संदर्भाने तारखा दिल्या आहेत.

सोबत छापलेल्या फारशी पत्रातून मूळ फारसी पत्रांची अथपासून इतिपर्यंत अस्सल बरहुकुम नक्कल केलेली आहे.

विजयादशमी,
शके १८४५.
पुणें
} **गंगाधरराव नारायणराव मुजुमदार.**

॥ श्री ॥

# शिक्क्यांचा तपशील.

## उभीरांग ( डावीकडून )

१ महमद हाफीजुल्लाखान बहादर. (११)

२ सयद नुरुद्दीन हुसेन मोहरी. (११)

३ मिस्तर जान मॅकफर्सन गव्हर्नर जनरल बहादर(६०)

४ टॉमस डे एस्क्वायर(५८)

५ विल्यम याकूब मंडी अराफ वलंदेज डरेक्टर कोठी कंपनी मुबारक सुरत वगैरे

६ जुबदे नवीनान अजीमुश्शान सर जॉन ब्लंट शोअर बहादर गव्हर्नर जनरल मुमालिके महरूसा सरकार अंग्रेज मुतालिके कीश्वरे हिंद (११७)

७ कॅपटन जॉन कनवे बहादर...(१०५)

८ कर्नल चार्लस मार्गन बहादर (३७)

९ राइट हानरबल एडवर्ड लॉर्ड क्लीफ बहादर गव्हर्नर चिनापटण वगैरा मुतालिके इंडिया सन. इसवी (१२४)

१० जॉन् ब्रिस्टो बहादर (२४)

११ विल्यम् टेलर एस्क्वायर (४)

१२ टॉमस किंग् (२०)

१३ इंग्ल ई० इंड० कंप० (४०)

१४ जुबदे नवीनान् अजीमुश्शान रफीउल् मकान् अशरफुल् उमरा सर जॉर्ज् हेब्ल्स बार्लो बारोनेट गव्हर्नर जनरल बहादर नाजम् मुमालिके महरूसा सरकार कंपनी अंगरेज़ मुतालिके कीश्वरे हिंद सन १२०२ हिजरी (१२६)

१५ कर्नल् जॉन् अपटन् बहादर ११८९ (२९)

१६ रॉबर्ट गॅबीर, एस्क्वायर(१८)

१७ चार्लस् वार मॅलेट ११९६ (६५)

१८ जोसास डुप्रे एस्क्वायर गव्हर्नदोर बंदर चिनापटण सन १७७० इसवी (१५)

१९ मशीरेखास हुजूरे सुलतान इंग्लिस्तान जुबदे नवीनान अजीमुश्शान गव्हर्नर जनरल चार्लस् अर्ल कॉर्न्वालिस् बहादर सिपाह सालार अफवाजे पादशाही व कंपनी मुतालिके कीश्वरे हिंद सन १२०५ हिजरी (७४)

डावी बाजू—१. मॅकलिऑड् (१३५) २. डॅनियल् सीटोन. (११८)
३. सी. मार्गन्. (३७) ४. जे. अपटन्. (२९)



उजवी बाजू–१. डी. ड्रेपर. (६) २. ए. पी. करी. (१२७) ३. जी. एच्
बार्लो. (१२६) ४. डब्ल्यू. एच्. ( वारन हेस्टिंग्ज ) २७.

१. जे. कनवे. ( १०५ ) २. डी. वॉथर्स्टन् ( ३५ )
३. जॉन्. मॅकफर्सन् ३० नवंबर ८५. ( ६० )





१. वेलस्ली. (१२३) २. पी. टामसन. (१२८) ३. जे. बी. (जॉन् ब्रिस्टो) २४



१. आर्. एच्. बॉडॅम्. मुंबई. २७ डिसेंबर १७८५. बी. ए. थेर्सी. महादोराव नारायण पेशवा यांस. } पत्रांक. ६१.

उजवी बाजू—१. एन्. मॅकफर्सन्. (८४) २. जी. एफ्. चेरी. (११९)
३. पी. एस्. (१११) ४. जे. डी. एम्. पी. (५)



डावी बाजू—१. अँड्र्यूज् रॅमसे. (७२) २. थामस्. डे. (५८)

# विषय-व्यक्ति-स्थळ-सूचि.

नावापुढील अंक पत्रांकाचे समजावेत

# कोणाकडून कोणास किती पत्रें गेलीं त्याबद्दल पत्रांकासह यादी.

| एकंदर पत्रे | कोणाकडून | कोणास | किती. | पत्रांक. |
|---|---|---|---|---|
| १४ | ( अनामक ) | पंडत साहेब | २ | ३१,१२९ |
| | | श्रीमंत साहेब | १ | ३३ |
| | | नबाब साहेब | १ | ७७ |
| | | मे० राजा | १ | १०३ |
| | | महाराजा | १ | १२० |
| | | रावसाहेब | २ | ५०,१४० |
| | | सखाराम बापू | १ | ३४ |
| | | सेवकराम | १ | २८ |
| | | हरिपंत फडके | १ | ५४ |
| | | ? | ३ | १०२,१३६,१४१. |
| २ | अपटन्, जॉन्- | नाना फडणवीस | १ | २९ |
| | | सखाराम बापू | १ | ३९ |
| १ | अर्काटकर नबाब | सवाई माधवराव पेशवे. | १ | १०४ |
| १ | कनवे, जॉन्- | हरिपंत फडके | १ | १८५ |
| १ | करी, ए. पी.- | महाराज ( सातारा ) | १ | १२७ |
| २७ | कॉर्न्वॉलिस्, लॉर्ड- | सवाई माधवराव पेशवे | १३ | ७४,८५,८९ ९०,९१,९३ ९४,९८,१००,१०१, १०७,१०८,११३, |
| | | नाना फडणवीस | ६ | ७६,८०,८१,१०६, १०९,११० |
| | | मे० पंडित | १ | ९२ |
| | | मे० रावसाहेब | १ | ९६ |
| | | हरिपंत फडके | २ | ९७,९९ |
| | | ? | ४ | ९५,११२,१३०,१३३ |
| २ | किंग्, टॉमस्- | हरिपंत फडके | २ | २०,२१ |
| २ | क्लीफ, लॉर्ड- | बाजीराव रघुनाथ पेशवे | २ | १२४,१२५ |
| २ | गॅबीर, रॉबर्ट- | सवाई माधवराव पेशवे | १ | १८ |
| | | हरिपंत फडके | १ | २२ |

| पर्कंदर पत्रें | कोणाकडून | कोणास | किती | पत्रांक |
|---|---|---|---|---|
| ४ | चिनापट्टण बंदर | सवाई माधवराव पेशवे | १ | ११५ |
| | | ( राघोबादादा पेशवे ) | १ | १७ |
| | | मे० रावसाहेब | २ | १,२ |
| १ | चेरी, जी. एफ्– | बाजीराव रघुनाथ पेशवे | १ | ११९ |
| १ | टॉमसन्– | मेहेरबान ? | १ | १२८ |
| १ | टेलर, वुइल्यम्– | मोरोबादादा फडणवीस | १ | ४ |
| ४ | डुप्रे, जोसास– | माधवराव बल्लाळ पेशवे | ४ | ३,५,१४,१५ |
| १ | डे, थॉमस्– | सवाई माधवराव पेशवे | १ | ५८ |
| १ | ड्रेपर, डॅनिअल– | हरिपंत फडके | १ | ६ |
| १ | पी, एस्.– | नाना फडणवीस | १ | १११ |
| २३ | बॉडॅम्, आर. एच्.– | सवाई माधवराव पेशवे | १८ | ४०,४५,४६,४७, ४९,५२,५७,५९, ६१,६२,६३,६४, ७०,७१,७८,७९, ८२,८६ |
| | | नाना फडणवीस | ४ | ४८,५५,५६,८३ |
| | | हरिपंत फडके | १ | २३ |
| १ | बार्लो, सर जॉर्ज एच्.- | बाजिराव रघुनाथ पेशवे | १ | १२६ |
| १ | बेल, जनरल मूरी– | मल्हारराव होळकर<br>परशुरामभाऊ पटवर्धन | १ | १३२ |
| १ | ब्रिस्टो, जॉन्– | सवाई माधवराव पेशवे | १ | २४ |
| १ | महमद आरिफ्<br>वकील नि॥ वलंदेज | नाना फडणवीस | १ | १३७ |
| ५ | मॅक्फर्सन्, जॉन्– | सवाई माधवराव पेशवे | २ | ५३,७३ |
| | | नाना फडणवीस | २ | ६०,८४ |
| | | रावसाहेब | १ | ६६ |
| १ | मॅक्लिऑड– | माधवराव पेशवे (?) | १ | १३५ |
| २ | मॅलेट, सर चार्लस वार- | नाना फडणवीस | २ | ६५,६७ |
| ३ | मॉर्गन्, चार्लस्– | नाना फडणवीस | २ | ३७,१३४ |
| | | नाना साहेब | १ | ३६ |
| १ | मॉन्टीनी– | रावसाहेब | १ | ३८ |
| १ | मेडोज, वुइल्यम्– | सवाई माधवराव पेशवे | १ | ८७ |
| १ | याकूब, वुईल्यम् | नानाफडणवीस | १ | १३८ |

| एकंदर पत्रें | कोणाकडून | कोणास | किती | पत्रांक |
|---|---|---|---|---|
| १ | रॅमसे, अन्ड्र्यूज- | सवाई माधवाराव पेशवे | १ | ७२ |
| १ | रतन बिन् बुढण सादुल्लाखान | चिंतामण दीक्षित | १ | ३२ |
| २ | वलंदेज- | परशरामभाऊ व मल्हारराव होळकर | १ | १३१ |
| | | किसनराव बल्लाळ | १ | १३९ |
| १ | वॉथर्स्टन्, डी.- | पंडित साहेब | १ | ३५ |
| ४ | वॉरन हेस्टिंग्ज्- (इमादुद्दवला बहादर) | नाना फडणवीस | १ | ३० |
| | | रावसाहेब | २ | १९,१७ |
| | | ? | १ | २६ |
| १ | वुइच, सिकंदर- | नारायणराव बल्लाळ पेशवे | १ | १६ |
| १ | वेलस्लि- | अमृतराव पेशवे | १ | १२३ |
| ५ | शोअर, सर जॉन्- | सवाई माधवराव पेशवे | २ | ११४,११७ |
| | | बाजीराव रघु० पेशवे | २ | १२१,१२२ |
| | | नाना फडणवीस | १ | ११६ |
| १६ | सय्यद नुरुद्दीन हुसेनखान मोहरी | नाना फडणवीस | ४ | ४१,४३,४४,५१ |
| | | नानासाहेब | १ | १० |
| | | हरिपंत फडके | १ | ७५ |
| | | नारायणराव मुनशी | ४ | ७,८,२५,६८ |
| | | सखाराम बापू | २ | ९,१२ |
| | | रावसाहेब | १ | ११ |
| | | बहिरव पंडत | १ | १३ |
| | | गोपाळराव | २ | ४२,६९ |
| १ | सीटन्, डॅनिअल- | बाजीराव रघुनाथ पेशवे | १ | ११८ |
| १ | हर्टले, जेम्स् | नाना फडणवीस | १ | ८८ |

१४१ एकूण पत्रे ३८ एकूण इसम

# ईस्ट इंडिया कंपनीचा पेशवे दरबाराशीं फारशी पत्रव्यवहार.

## मराठी रूपांतर.

पत्रांक १ ॥ श्री ॥ ( बंदर चिनापट्टण )

शके १६८९ फेब्रुवारी १७६८ इ.

**रावसाहेब** (?) यांस-विशेष-मजकडून पत्र वगैरे येऊन काहीं खबर न समजल्यामुळें शंका व आश्चर्य दाखविणारें व मिस्तर **ब्रोमसाहेब*** हे बंदर मुंबईहून आपलेकडे येऊन त्यानी इकडील काही बोलणें चालणें केलें नाही म्हणुन वगैरे मजकुराचे आपले स्नेहपत्र आलें तें पोहोचून आनंद झाला. आपणांस जें आश्चर्य वाटतें ते मला वाटणाऱ्या आश्चर्यापेक्षा जास्त नाही, कारण मी आपणांस आद्य व उत्तम स्नेही जाणुन दोन तीन वेळां पत्रें पाठविली आहेत. व शिवाय मिस्तर **ब्रोम** यांसहि आपिली मर्जी इकडील भागांत येण्याची असल्यास आपणांस पसंत वाटणारे व दोस्तीचा पाया मजबूत करण्यासारख्या गोष्टी आपल्या सेवेसी कळविण्याविषयी ताकीद केलेली होती. परंतु आतां हातांत आलेल्या वर्तमानावरून समजतें की, मिस्तर मजकूर हे मुंबई बंदरास परत गेलेले आहेत, तथापि माझ्या मनांतील परस्परांतील स्नेह पूर्वीप्रमाणें च आहे म्हणुन मिस्तर मजकूर याचे मुंबईस परत जाण्याबद्दल मला विशेष काहींच वाटत नाही. आपण आज्ञा केलेल्या रीतीनें वजाप्रमाणें असलेल्या परस्पर मैत्रीमध्यें केव्हांहि फेरफार व बदल होणार नाही. **नवाब वाला जाहा** हेहि उभयांशी अशाच रीतीनें अमल आहेत. व याच गोष्टीकडे लक्ष देऊन **नवाब** मजकुरांनी आपलेकडे स्नेहपत्र पाठविलें आहे. आता माझी विनंति एवढीच आहे की, कृपेनें वरचेवर पत्र पाठविण्याची आज्ञा करावी. बहुत काय लिहू !

---

* सदर Charles Brome हा पुण्यास ता. २५।१।१७६८ रोजी येऊन **मिस्टर मास्टिन्** बरोबर ता. २७।२।१७६८ रोजीं मुंबईस गेला.

पत्रांक २ ॥ श्री ॥ ( बंदर चिनापटण )

शके १६८९ फेब्रुवारी १७६८ इ.

रावसाहेब (?) यास-विशेष—आपलेकडून **लाला तुळजाराम वकील** यांजसमागमे एक कृपापत्र व सोबत पोषाख असे कृपेनें पाठविले ते पोहोंचून फार आनंद झाला परस्परांतील स्नेह मध्यंतरी पत्र नसल्यामुळें नाहिसा झाल्यासारखा जणू काय होता. वकील मजकूर हे आपणाकडे परत येत आहेत, परस्पर दोस्तीचे मजकूर सदर लाला यांच्या सांगण्यावरून समजून येतील. आपले पत्राबरोबर इकडून आपणास पाठविलेले पहिले पत्र आलेलें पाठवीत आहे व त्याच पहिल्या पत्राबरोबर एक पत्र मिस्तर **ब्रोम** याजकडे पाठविले होते. मशारनिलेस स्नेहवृद्धीच्या गोष्टी बजावून सांगितल्या आहेत. परंतु आपलेकडून किंवा **लाला** मजकुराकडून कांहीं पत्र नसल्यामुळे त्या गोष्टी आपणास पसंत आहेत किंवा नाहीत हें कांहींच समजत नाही. आपली मर्जी असेल तर एका लायक माणसास आपल्या सेवेसी पाठवीन किंवा मिस्तर मजकूर ( **ब्रोम** ) आपणाजवळ असतील तर त्यास पूर्वीप्रमाणें तपसीलवार लिहिले जाईल. नेहेमी स्नेहपत्र पाठवून खुष करावे. बहुत काय लिहिणें ? ताजाकलम--स्नेहास अनुसरून एक पिस्तुलजोडी नजर पाठविली आहे. त्या प्रत्येकास दोन नळ्या आहेत. आपण स्वीकाराव्यात. बहुत काय लिहिणें ?

---

पत्रांक ३ **जोसास डुप्रे गव्हर्नर बंदर चिनापटण.**

शके १६९१ माघ शु. १५ ॥ श्री ॥ रा। १०।२।१७७० इ.

मेहरबान **माधवरावसाहेब** यास—विशेष—

यापूर्वी येथील माजी गव्हर्नर **मिस्तर बुचर** यानी आपणाकडे पत्र ता० २९ रमजान रोजी लिहून स्वतःचा गव्हर्नरी सोडण्याचा हेतु व गव्हर्नरीच्या अधिकारावर मला येथे नेमल्याची खबर कळविली आहेच. मीहि स्नेहपत्रानें कळवितों कीं, सदर अधिकाराची सूत्रें माझ्या हातात घेतली आहेत. आपण सरदार कंपनी व सरकार **नवाब वालाजाह** यामधील परस्परस्नेह वाढविण्यात आपण व मी यामधील स्नेह दृढ करण्याकरिता मी मनापासून खटपट करीन अशी आपण खात्री बाळगावी. यापेक्षा जास्त काय लिहू ? चिरायुष्य, वैभव व शांति आपणास चिरकाल लाभो. वरकड, त्याच दिवशी गवर्नर मजकूर हे विलायतेस जाण्याकरिता जहाजावर स्वार झाले. आपल्या वकिलाची व माझी भेट होऊन फार आनंद झाला. आपलेकडून नजराण्यासह एक कृपापत्र माझ्या नावें आलेले आहे असें आपल्या वकिलाकडून समजलें. थोडक्याच अवकाशांत परस्पर दृढ दोस्तीस अनुसरून सम्मानानें त्याचा स्वीकार करीन.

---

**पत्रांक ४** ॥ श्री ॥ **विल्यम टेलर.**

शके १६९१. १७७० इ.

**मे० दादासाहेब मोरो पंडित** दिवाणसाहेब यास–विशेष, मी कलकत्त्याहून निघालों तों हिंदुस्थानात पोहोंचून तेथे एक वर्ष पावेतों **नवाब नजीफखान** बहादूर याजसमागमें तोफखाना व पलटणीसह मुक्काम होता त्यावेळी **नाघा पंडित** (?) हेहि योगायोगानें त्याच जिल्ह्यात होते ..... **राव** याची भेट झाली त्यांची **गुणग्राहकता** व मनुष्याम ओळखणे व एकदर अंतर्बाह्य गुण ( या गोष्टी ) पाहून माझी तबीयत फार खुष झाली. माझ्या मनात पलटणीसह येऊन आपल्या भेटीचा लाभ घ्यावा अशी अनावर इच्छा झाली आहे. राव [illegible] यानी सांगितलें की, **बापूसाहेबांस** लिहून उत्तर आणविते त्यानंतर निश्चय ठरवावा वरकड गोष्टी **रावसाहेबांच्या** लिहिण्यावरून समजून येतील मी पलटणीसह येण्याबद्दल आपली इच्छा असल्यास तावडतोब तसे लिहावें मी पलटणीसह आपल्या सेवेसी हजर होऊन परीक्षारूपी कसोटीस माझा पराक्रम उतरवून दाखवीन. व जे थोर सरदार हिंदुस्थानात आलेले आहेत त्यासह हाजर होऊन त्यास स्नेहाच्या नात्याने आपणापुढें सादर करून व त्यास सरकारचेच ( आपले ) समजून त्यास **पेशवे**साहेबाच्या नौकराच्या माळेत गुफतो. ( त्या ) सरदाराच्या नावें आपल्या मोहोरनिशी पत्रे जावीत. म्हणजे त्या वरून मी त्याची भेट घेऊन वरचेवर पत्रें लिहवून खबर कळवीन व सरदाराचा मान मरातब ठेवून सरकाराच्या कामात दक्ष राहीन. बहुत काय लिहिणें !

---

॥ श्री ॥ **जोसास डुप्रे गव्हर्नर**

**पत्रांक ५** **बंदर [illegible]पटण.**

शके १६९२ पौष व॥ ९. रा। ९।१।१७७१ इ.

**श्री० माधवरावसाहेब पंडित प्रधान** यास–विशेष–महेरबान दोस्ता **माधवराव सदाशिवराव** याजबरोबर आपलें कृपापत्र आले ते पोहोचुन फार आनंद झाला. आपणां परस्पराचे मित्र ***नवाब वालाजाहा** यानी सदर राव यांची व आमची भेट करविली. आपल्या पत्रात तपसीलवार हकीकत न लिहितां सदर राव याच्या जबानीवर हवाला दिला होता **नवाब वालाजाहा** यानी आमची भेट करविली त्यामुळें फार आनंद झाला. सदर भेटीत काही गोष्टीची वाटाघाट झाली. परंतु सध्या ख्रिस्तमस व रमजान हे दोन सण मध्यतरी असल्यामुळें बाकी गोष्टी काही दिवसपावेतों तहकूब ठेविल्या आहेत. थोड्याच दिवसात सण सपतील व ते संपताच

---

* अर्काटचा नवाब.

लागलीच सदरहू **माधवराव सदाशिवराव** याच्या भेटीनें आम्हास खुष करावे कारण सदर राव हे फार हुशार व बुद्धिमान आहेत. मी हें पत्र कंपनीसरकार व आपण यांमधील जुनी चालत आलेली मैत्री दृढ व्हावी या हेतूनें पाठविलें आहे. बहुत काय लिहिणें ! सुखाचे दिवस नेहमी वृद्धिंगत होवोत.

**जे. डी. एम्. पी. ?**

---

**पत्रांक ६** **॥ श्री ॥** **डॅनियल ड्रेपर.**

शके १६९३ ज्येष्ठ शु० १३. ता २६।५।१७७१ इ.

**मे० हरिपंडत फडके** यास—स्नेहधर्मास अनुसरून अकृत्रिम स्नेह व प्रेम दर्शवून जाहीर करितों की, काही दिवसांपूर्वी आपले कृपापत्र पोहोंचून तें वाचून फार आनंद वाटला. दीगर की, येथील आपल्या कारभाऱ्याशी आपल्या कामाच्या बाबतीत काही बोललों नाही हें आपणांस माहीत झालें आहेच. तथापि मी त्याच्याशी बोलणें चालणें करण्यास असमर्थ नव्हतों. हली असें समजतें की, ती बाबत बाक्याबद्दलची असून आपणास माहीत आहेच. तरी आपण आपल्या अधिकाऱ्यांस या बाबीचा निकाल करण्याबद्दल हुकुम करावा. त्याचा निकाल नीट तऱ्हेनें होईल अशी मला खात्री आहे. परस्परतर्फेच्या कामाचा शेवट स्नेहानें करण्यांत मला फार समाधान वाटतें. आपला आयुष्यसूर्य व वैभव नेहमी चकाको. लिहिलें तारीख २६ सव्वीस माहे मे सन १७७१ इसवी. छ ८ माहे सफर सन ११८५ हिजरी.

**डी. ड्रेपर**

---

**पत्रांक ७** **॥ श्री ॥ सयद नुरुद्दीन हुसेनखान मोहरी**

शके १६९३ १७७१ इ०

**रावसाहेब मुनशी नारायणरावजी** यास—दख्खनहून परत निघाल्या वेळेपासून आपलें एक पत्र येथें पोंहोचले. व सरकारच्या तीन जोड्या तेथें गेलेल्या आहेत. (परंतु) सरकारचें काम कोणत्या मार्गास लागले आहे हें मात्र समजत नाही. व साहेबानी आपलें स्वतःचें पत्र जबाबावर तहकूब केलेलें आहे. लवकरच पाठविण्यात येईल. म्हणजे त्यामुळें समाधान होईल. **पेशवे**साहेबाच्या ताब्यातील मुलूख **शुजाउद्दौला** वगैरे माणसानी आपल्या ताब्यांत घेतलेला आहे ही हिंदुस्थानची खबर यापूर्वीच आपल्या कानावर आली असेलच. पुढील वर्षी या गोष्टीची व्यवस्था करण्यास अवघड जाईल. फिरंगी यांचा कारभार फार चांगला आहे. कारण, शक्ति आहे व त्यांच्या ताब्यात **शुजाउद्दौला** व **बादशाहा** असे दोघेजण अ

**नूर लुत्फ हाजी महमदखान** हे आपले दोस्त झालेले आहेत. **महमदखान** यांनी हुजूर पाठविलेला अर्ज व **हाजी महमदखान** यांनी आपल्या भावास पाठविलेलें पत्र अशी दोन्ही तपशीलवार दादासाहेबांस समजाऊन द्यावी. हा (त्यांनी पत्करलेला) जिम्मा हिंदुस्थानच्या बंदोबस्ताकरिता फार चांगला व कौतुकास्पद आहे. बादशाहाजादा हि बादशाहामध्यें एक चांगला माणूस आहे. त्याच्या राज्यांत फिरंगी वगैरे हि हजर आहेतच. (ते) त्याच्याशीहि पत्र व्यवहार करीत असतात. ही सर्व गोष्ट **दादासाहेबांच्या** मनात पटवून द्यावी. व या बाबतीत जबाब फिरंगी सरदारांच्या नजरेस पडण्याजोगा असा असावा. फिरंगी सरदारानी आपणांस कळावें म्हणून आपणास व **दादासाहेबांस** पाठविलेली पत्रे येऊन पोहोंचतीलच. सनदेसंबंधी इतका विलंब काय कारणानें झाला आहे ? जनाबे आली हे **दादासाहेबाकडून** फार आशा करतात. पत्राचें उत्तर लवकर पाठवावे. फिरंग्याचे विचार हि त्या पत्रांत लिहिलेले आहेत. ती मी अर्जासोबत ठेविलेली आहेत सदर बाबी-बद्दल दादासाहेबास आपण तपशलिवार समजाऊन सांगावे व जाहागीरीची सनद द्यावी. या बाबतीत कोठवर ताकीदी करावयाच ? हें छोटें पत्रहि ताकीदच समजावी घरात कोणीहि एक माणूस असेल तर त्यास एकच हाक पुरे आहे. **भास्कर-राव** यास व **लाला फत्तेचंद** यास सलाम.

---

**पत्रांक ८** ॥ श्री ॥ **सयद नुरुद्दीन हुसेन**

शके १६९३ १७७१ इ.

रावसाहेब **नारायणराव (मुनशी)** यास— विशेष. काल रोजी आपणास एक चिठी पाठविली तिचा अद्याप निकाल केला नाही आपण आपले चिरंजीव व भाऊचंद्रमंडळी इकडे पाठविण्याचें राहित केले होतें परंतु दोन तीन इसम (ज्याना येथें पाठविणार होता ते) व **भास्करराव** व **फत्तेचंद** यास जलद रवाना करावें कारण ते सर्व गोष्टीचा निकाल करून जातील.

---

**पत्रांक ९** ॥ श्री ॥ **सयद नुरुद्दीन हुसेन**

शके १६९३ १७७१ इ.

**मे० बापू सखारामसाहेब** यासः—

विनति उपरि. आज्ञेप्रमाणे मी **विश्वासरावासह अंबाजी** (?) याच्या लष्करात पोहोचलो व भेट झाल्यानतर आपल्या जहागीरीचाबतीत सनदा हवाला केल्या व तोंडी मजकूर निवेदन केला आज उद्या अशा तऱ्हेने नर्मदेपावेतों आणिलें व साफ सांगतात की, "दोन लाख रुपये वसुलीचे घर तुम्हास मिळणार

नाही. दोन लाख रुपये तनखा आहे. तनख्यापैकीं चवथा हिस्सा वसूल होत आहे, व बाकी तीन हिस्से स्वतःच्या जिम्यावर आहेत. यांत जबाब स्पष्ट आहे " व आणखी म्हणाले कीं, "**बापूसाहेबांनीं** परगण्याचें नाव तुमच्या सनदेत दाखल केलेलें असतें तर या लढ्याचा निकाल चागला लागला असता. आता ये या साला-पासून घर तुमचे होईल या सालाची रकम सरकारात पोहोचली " साराश, आमच्या कोणत्याही कामाचा लाग आजपावेतो लागत नाही. जो सर्व हिंदुस्थानात प्रसिद्ध आहे अशा **नवाब वजीरास** दोन लाख रुपयांचे घर रावसाहेबांनी मेहरबानीने दिले, परतु अखेर काय ? तुम्ही मात्र दुबार म्हणतां कीं, श्रीमत साहेबानी काय म्हणून दिलें ? सबब ( आता ) कायमकरार झाला आहे कीं, पावसाळा सपल्यावर आपण आपल्या कुटुंबासुद्धां यावें. समक्षच सर्व होईल. परगण्याचें नाव वरक असे तेथून लिहिलें आहे. परगणे मजकुरी लिहिलें आहे. यानतर आपल्या मर्जीप्रमाणें होणार आहे. बहुत बहुत

---

**पत्रांक १०** ॥ श्री ॥ **सयद नुरुद्दीन हुसेन**

शके १६९३ १७७१ इ.

मे. **नानासाहेब** यास——विनति उपरि. यापूर्वी परगणे कलसरा (?) बद्दल व **विश्वासरावा**बरोबर जाण्याबद्दल व हेतु साध्य न झाल्याबद्दल वगैरे हकीकत आपल्या सेवेसी लिहिलेली होती. त्यानतर येथें म्हणजे सागरमध्ये **आलीजनाब** याची स्वारी आली आहे. येथील हकीकत पूर्वीप्रमाणेंच आहे म्हणून मला **साहेब-जादा** व सरकारचें कुटुब व **विश्वासराव** यासह येथेच ठेऊन आपण बुंदेल-खडाच्या **हिंदुपतराजाकडे** गेले या कामांत **जनाब आलीस** फार त्रास व नुकसान आहे. व तें कामहि अद्यापपावेतों व्यवस्थित नाही **बाळाजी पंडिता**च्या नावें एक ताकीदपत्र व **विसाजीपंडता**च्या नावें पत्र व झांशीच्या सरदारास एक ताकीदपत्र यावें घर मोकळे करवावे. **जनाब आली** तेथे आले असता त्यास अडचण होऊ नये. या गोष्टीची शरम तुम्हास वाटावयास पाहिजे बहुत काय लिहिणें, विशेष.

---

**पत्रांक ११** ॥ श्री ॥ **सयद नुरुद्दीन हुसेन**

शके १६९३ १७७१ इ.

**रावसाहेब** यास— मी आपली परवानगी घेऊन निघून येथे पोहोंचल्या दिवसापासून प्रत्येक क्षणास व तासास आपली आठवण करण्यात निष्काळजी नाही. **जनाबे आली लाला सुखराम** यांस तेथे राहण्याकरितां पाठविलेलें आहे.

ते तेथें आपल्या सेवेसी राहतील. आपण **जनाब आलीच्या** हितचिंतनामध्यें गढलेले आहांत. त्यांचेजवळ जी गोष्ट काढाल तिकडे ते लक्ष्य देतील व ती गोष्ट ते उत्तम तऱ्हेनें पार पाडतील. स्नेह्यांस न विसरता नेहेमी कृपापत्र पाठवून आठवण ठेवावी. विशेष.

ताजाकलम – जयपुराहून आलेला शहाजहानी अखबाराचा कागद वगैरे आलेला होता तो पाठविला गेला आहे तो आपण नजरेखाली घालावा, इतकेंच नव्हे तर त्यांतील मजकूर श्रीमंत सरकार **पेशवा पंडितसाहेब** व **बापूसाहेब** यास जाहिर करालच. व **जनाबे आली** याच्या सर्व कामासंबधी आपण पूर्णपणे लक्ष्य देऊन तत्तर असावें. कारण आपण आम्हांसमक्ष स्वतः तोंडानें **जनाबे आलीचे** काम पादशाहतीस योग्य असें व्हावें म्हणून बोलला आहांत. आपण आपलें बोलणे कायम केले पाहिजे विशेष काय !

---

**पत्रांक १२** **॥ श्री ॥** **सयद नुरुद्दीन हुसेन**

शके १६९३ १७७१ इ०

**रावसाहेब बापू सखाराम** यास–विशेष–आपली या गरीबावर जी कृपा आहे तिचें वर्णन लिहून अथवा बोलून करता येणार नाही मीहि आपणाशी असाच स्नेह व प्रेम ठेवीत आहे व तें मी जीवत आहे तोंपावेतों ठेवीन. व तें दररोज वाढत जाईल. नेहमी कृपापत्र पाठवुन आनंदवीत जाल अशी आशा आहे, कारण त्यामुळें मला विशेष सुख होईल. अलीकडे शहाजहानाबादेहून अखबारीचा बद आला तो भरवशाच्या माणसाबरोबर रवाना केला आहे. आपण तो वाचुन श्रीमंत **पंत प्रधान** यास दाखवालच. महाराज, केवळ आपल्या सांगण्याप्रमाणे तिकडे रवाना झालो आहे मी आपला फार आभारी आहे. बहुत काय !

---

**पत्रांक १३** **सयद नुरुद्दीन हुसेन**

शके १६९३ १७७१ इ०

**मे० बहिरव पंडत** यांस–

आज आपणांपासून रवाना झालो तों रात्री ९ वाजण्याचे सुमारास मुक्काम आनदगिरीस पोहोंचलो. कारभारीसाहेबाकडून घर कायम करण्याच्या बाबतीत जे उत्तर आले होतें ते **नवाब एहतेशामुद्दवला** बहादर यांस सांगितले. त्यावरून मानिले **नवाबसाहेब** यानी या बाबतीत मुद्दाम **नानासाहेबांस** व आपणांस पत्र लिहून कायम केलेले होतें. घर न मिळाल्यामुळें फार काळजींत आहेत. मध्यंतरी मुंबईहून जनरल साहेबाचे पत्र श्रीमंताचें नांवें पोहोंचलें तें माझ्या स्वतःच्या

पत्रासोबत पाठविलेलें आहे. याकडे लक्ष्य देणें अवश्य आहे. घराच्या बाबतीत उत्तर जरूर देणें. विशेष, सुखी असा. या सोबत **बाजीबाची** चिठ्ठी पाठविली आहे.

---

**पत्रांक १४** **॥ श्री ॥** **जोसास डुप्रे गव्हर्नर बंदर चिनापटण.**

शके १६९४ आषाढ वद्य १३ रा॥ २८।७।१७७२ इ.

**श्रीमंत माधवरावसाहेब पंडत प्रधान** याचे सेवेसी विशेष. रोहिल्यावर शुक्रताल प्रांतांत आपल्या थोर सरदारानी विजय मिळविल्याबद्दल मजकुराचे आपले स्नेहपत्र पोहोंचलें. त्यामुळे फार आनंद झाला या शुभकार्यानिमित्त ईश्वर आपणा सर्व मित्रमंडळास सुखी व आनंदी करो. या गोष्टीमुळें मला किती आनंद झाला हें लिहिण्याची आवश्यकता नाही, कारण, आपणा परस्परांमधील असलेली दोस्ती पक्की आहे व त्यामुळें परस्पराचें काम आपलेंच आहे असें समजले जातें. म्हणून वरील गोष्टीमुळे( माझ्याच सरदारांचा विजय झाला आहे असें वाटत असल्यामुळेंच ) मला जो परमानंद झाला आहे तो सविस्तर सांगणे शक्य नाही आपण इकडील खुषी विचारली तरी ती आपणांवरच अवलंबून आहे आपण नेहमी कृपापत्र पाठवून आनंदवीत जाल अशी आशा आहे बहुत काय लिहावें ? अखंड सुखी असा.

**जे डी एम् पी. (?)**

---

**पत्रांक १५** **। श्री ॥** **जोसास डुप्रे गव्हर्नर बंदर चिनापटण.**

शके १६९४ श्रावण शु. ११ रा॥ ९।८।१७७२ इ.

**श्रीमंत माधवरावसाहेब** यास-विशेष-आपणाकडून बरेच दिवसांत कुशलपत्र येऊन मला खुषी केले नाही. ता. ९ जानेवारी सन १७७१ मुताबिक छ. २२ रमजान सन ११८४ हिजरी रोजी आपणास एक पत्र लिहिलें होतें त्यांत आपले वकील **माधवराव सदाशिव** याची भेट झाल्याबद्दल लिहिले होतें. हल्ली लिहिण्यांत येतें की, आपले व माझे असे दोघाचे मित्र **नवाब वालाजाहा** बहादर यांनी सदरहु **माधवराव** येथें पोहोंचल्यावेळी ज्या कांहीं गोष्टी सविस्तर निवेदन केल्या त्याबद्दल लिहिण्याजोगा मजकूर मी विलायतेस लिहिला आहे. थोडक्याच दिवसात तेथून संगीन फौजेसह जहाजें पोहोंचण्याची आशा आहे. बरकड गोष्टी **नवाबसाहेब** आपणांस, कळवितीलच.

माझी एवढीच विनंति आहे की, आपण कृपेनें कुशलपत्र नेहेमीं पाठवीत जाऊन माझें मन काळजीमुक्त करावें. बहुत काय लिहिणें !

**जे. डी. एम् पी. (?)**

---

**सिकंदर बुईच गव्हर्नदोर**

**पत्रांक १६** ॥ श्री ॥ **बंदर चिनापटण**

शके १६९४ फाल्गुन शु० ३ २४।२।१७७३ इ.

**श्रीमंत नारायणरावसाहेब**-यांस-विज्ञापना विशेष कंपनीसरकार व आपण यांमध्ये असलेल्या पक्क्या मैत्रीवर नजर देऊन इकडील हकीकत आपणांस कळविणें मला अवश्य वाटतें की, येथील गव्हर्नदोर **मिस्तर डुप्रे** यांचा विलायतेस जाण्याचा हेतु आहे व त्याच्या या प्रांताच्या गवर्नदोरीच्या जागेवर मी कायम आलों आहे. **कंपनी** व आपण आणि **नवाब वालाजाह** व आपण यांमधील पक्क्या मैत्रीस जपण्यात मी मनापासून तत्पर आहे. बहुत काय लिहावें ! नेहेमी खुशी असावें.

---

**पत्रांक १७** ॥ श्री ॥ **बंदर चिनापट्टण.**

शके १६९५ कार्तिक शु २ १७।१०।१७७३ नंतर

**मे० रावसाहेब पंडित प्रधान** याचे सेवेसी-विशेष आपलें स्वतःच्या मोहेरेनिशी कृपापत्र तारीख १७ माहे आक्टोबर सन १७७३ इ. मुताबिक छ. २९ माहे रजब सन ११८६ हिजरी रोजी लिहिलेलें माणसाहाती पोहोंचलें. त्यांत **नारायणराव** मृत्यु पावल्याबद्दल लिहिलेलें होते त्यामुळें मला इतकें वाईट वाटलें की, त्याच माणसाबरोबर आपला गादीवर बसण्याचा इरादा असल्याबद्दल मजकुराचे पत्र आलें नसते तर ते दुःख मला आवरलें नसतें. ही शुभवार्ता अमलांत आल्याबद्दल समजण्याची रात्रंदिवस वाट पहात आहे. शक्य तितके लवकर आपण ही शुभेच्छा अमलात आणून मला खबर द्यावी. म्हणजे समाधान होईल. सुखाचा काल असो.

---

**पत्रांक १८** ॥ श्री ॥ **रॉबर्ट गॅंबीर**

शके १६९५ भाद्रपद शु० ७ रा २४।८।१७७४ इ०

**श्रीमंत माधवराव नारायणराव पेशवा** साहेब यास-विशेष.

स्नेहपूर्वक आपणास कळावें की, आपणास श्रीमंत महाराजसाहेब यांनी पेशवाईपदाची अति मूल्यवान वस्त्रांची देणगी दिल्याबद्दल मजकुराचें आपलें पत्र

पोंहचून अत्यानंद झाला. प्रथम वरील गोष्टीबद्दल अभिनंदन करून नंतर ईश्वराच्या दरबारी अशी प्रार्थना करतो कीं, त्याने या देणगीनिमित्त आपणांस आपल्या दूर-जवळच्या सर्व स्नेह्यांस व हितचिंतकास नेहमी सुखी राखावें व आपणामुळे आपल्या गादीचें वैभव वृद्धिंगत व्हावें. आशा आहे की, आपण कृपेनें कुशलपत्र पाठवीत जाल. आपला वैभवसूर्य राज्यलक्ष्मीरूपी पूर्व दिशेकडुन उगवो. लिहिलें तारीख २४ माहे आगष्ट सन १७७४ अंग्रेजी छ० १५ जमादिलाखर सन ११८८ हिजरी.

---

**पत्रांक १९** ॥ श्री ॥ **(वॉरन् हेस्टिंग्ज)**

**इमादुद्दौला बहादर**

शके १६९७ १७७५ इ.

मेहेरबान **रावसाहेब** यास (१) विशेष-मराठा सरकारची पूर्ण मुखत्यारी व गादी (= कारभार) आपल्या हातात आहे अशी माझी पक्की खात्री आहे. सबब आपल्या व इंग्रजसरकारासंबंधी मुंबईस घडून आलेल्या गोष्टी आपणास लिहिणें मी अवश्य समजतों. **रघुनाथराव** यांस पेशवाईवर कायम करण्याकरिता जो त्यांचा हेतु त्यास अनुसरून त्यास सामील होऊन मोठी फौज लढाईकरिता पाठविली म्हणुन खबर तेथील गव्हर्नर व कोन्सल याच्या पत्रावरून समजली. ही गोष्ट कंपनीच्या आज्ञेबाहेरची झाली कारण, 'हिंदुस्थानच्या सरदारांशी लढाईच्या प्रसंगापासून दूर रहाणें' याप्रमाणे कंपनीची सक्त ताकीद आपल्या प्रातात दिली गेली आहे. वरील गोष्ट आमच्या पातशहाच्याहि आज्ञेविरुद्ध आहे. कोणाशीहि कौलकरार करणें किंवा लढाई सुरू करणें हें गव्हर्नर जनरल व कौसल बगाला याच्या परवानगीशिवाय योग्य नव्हे असा हुकूम हिंदुस्थानांतील कपनीच्या प्रांतातील कारभाऱ्याना दिला गेला आहे सबब मी व येथील कोसल यानी मुबईच्या गव्हर्नरास व कौसलास हुकूम पाठविला आहे की, '**रघुनाथरावांच्या** मदतीकरिता पाठविलेली फौज परत बोलावून द्यावी व मराठ्यांच्या सरदाराशी कोणतेहि प्रकारें स्वसंरक्षणाशिवाय लढाईंत पडू नये' माझा हेतु असा की, एक हुशार, विश्वासुक, शहाणा व चतुर माणूस पुण्यास पाठवावा. कारण, पुणे **पेशव्यांची** राजधानी असून मुबईनजीक आहे आणि मराठासरकार व मुंबईचे सरदार यांमधील तट्याचा निकाल लागेल व परस्पर स्नेहवृद्धिहि होईल. पण, या पत्राचें उत्तर व आपले इष्ट हेतु समजेपावेतो त्यास पाठविणे तहकूब केले आहे. व तोंपावेतो आपणहि आपल्या प्रातातील सरदारांस इग्रजी फौजेशी लढाई न करण्याबद्दल ताकीद करावी. म्हणजे परस्पर तह ठरवितांना अडथळा येणार नाही परस्पर दोस्तीचा पूर्वींचा पाया पक्का करण्याकरितां व आपली व माझ्यावर सोंपविलेली कपनीची भलाई यांवर नजर देऊन आपणास लिहीत आहे आपल्या हुशारीबद्दल व शहाणपणाबद्दल मला चोहोंकडून लौकिक ऐकूं येतो व त्यावर माझा भरवसा आहे.

तरी या बाबतीत शक्य ती तजवीज करण्यास आपण मागे घेणार नाहींत जोपावेतों परस्पर हेतु परस्परास समजणार नाहींत तोपावेतोंच काय ती कसूर होईल. बहुत काय लिहिणें.

डब्ल्यू. एच्.

---

**पत्रांक २०** ॥ श्री ॥ **टॉमस् किंग**

शके १६९७ फाल्गुन व॥ १४ पा॥ १९।३।१७७६ इ.

मेहेरबान एतेजादे दोस्तान **हरिपंत बल्लाल** यांस- ( आपली ) लागो दोन स्नेहपूर्ण पत्रें-एक मोहरम तारीख २२ रोजी व दुसरें तारीख २४ रोजी लिहिलेलें-अनुक्रमे ता. २६ व २८ रोजी पोहोंचून मजकूर समजला. मेहेरबान, यापूर्वी आपले पहिलें पत्र मिळालें तेव्हां त्याचे उत्तरी आपणास दोन पत्रें पाठविलीं आहेत ती पोहोंचून वाचली असतीलच अशी मला खात्री वाटते. त्यात इकडील सर्व खबर मी लिहिलेली आहेच. व हें पत्र लिहीपावेतों मला सल्ल्याबद्दल खात्रीशीर हुकूम मिळालेला नाही, व मला असें वाटतें की, श्रीमंत **पंतप्रधान** साहेब हे सदर गोष्ट स्वीकारणार नाहीत. व तुम्हीहि तसे अमलात आणणे हें योग्य आहे. असो जी गोष्ट घडेल ती नजरेसमोर येईलच. ( आपण ) लिहिलेलें होतें की, " स्नेहाचा बाग नेहमीं हिरवागार व टवटवीत राहो " ( परंतु ), एतेजाद, ज्याचें बी सुद्धा पेरलेलें नाही त्याचें फल कसें येईल ! इतकेंच नव्हे तर उलट, फळ येणें संभवनीयहि नाही. या जिल्ह्यांत योग्य सल्ला व्हावा अशी आमची मनीषा आहे. यापेक्षां जास्त तपशील काय द्यावा !

---

**पत्रांक २१** **टॉमस् किंग्**

शके १६९८ चैत्र शु. ५ पा। २४।३।१७७६ इ.

मेहेरबान एतेजादे दोस्तान् **हरिपंत बल्लाल** यास—सलामत्—काल मुंबईचे कौसलदार व **जनराल** साहेब यांचे आज्ञापत्र व सोबत परस्परांतील ठरलेला करारनामा माझ्या नावें आलेला पोहोंचला. त्यांतील मजकूर श्रीमंत **पेशवे**-साहेब याच्या सेवसी जाहीर करीनच. आपल्या नावाचे माझे पत्र आपणास पोहोंचेपावेतों आपण तेथून कूच करूं नये व पहाडरस्ता ( खिंड ) ओलांडून जाऊं नये. परस्पर सैन्यातील टोळ्यानीं एकमेकांस कोणतेहि प्रकारें हरकत करूं नये व त्रास देऊं नये असे करारनाम्यांत लिहिलेले आहे. तरी आपण आपल्या स्वतःच्या सर्व सैन्यास निक्षुण ताकीद करावी कीं, त्यांनी सरकार श्रीमंत **पेशवे** साहेब यांजकडील जो कोणी येईल अथवा जाईल त्यास कोणतीहि हरकत व त्रास न पोहोचेल असें

करावें. जर कदाचित् याविरुद्ध गोष्ट अमलांत आली तर कराराप्रमाणें न वागतां विरुद्ध वागतां असें समजलें जाईल. यापेक्षां जास्त ( लिहिणें ) जास्त आहे.

---

**पत्रांक २२** ॥ श्री ॥ **रॉबर्ट गॅंबीर**

शके १६९८ वैशाख व० ९ रा। १२।५।१७७६ इ.

**मे० हरिपंत बल्लाळ ( फडके ) यांस**—विशेष—आपली कांही पत्रें मला मिळाली. त्या सर्वांचा मजकूर समजला. ज्यामध्यें परगणे परत देण्याबद्दल मजकूर आहे असें असेरचें एक पत्र आज सकाळी पोहोंचलें. त्याचें भाषांतर होण्या-पूर्वीच हें माझ्या लक्ष्यांत आलें. सरदारांनी **कर्नल अपटन्** यांस पुण्यास पाठविलें आहे. आम्ही होऊन कोणतीहि एखादी गोष्ट करणार नाही असें आपण व इतर शहाणा विचारी माणूस खात्रीलायक समजेल असें मला वाटतें. कारण **कंपनी इंग्रज** सरकारचे आम्ही नोकर आहोंत. आम्ही ( आपलें म्हणणें ) कबूल करीत नाही. कारण त्याचें नुकसान होईल. हुकूम करणारे ते आहेत. आम्ही त्याचे ताबे-दार आहोंत. आम्ही सल्ला व दोस्तीची अपेक्षा करितों. व त्याकरितां आम्ही प्रयत्न करितों. आपली जी कांही आज्ञा असेल ती मुंबईच्या कौंसिलच्या साहेबापुढें तशीच ठेवण्यांत कसूर करणार नाही. जी कामें पुष्कळ दिवसापासून व्हावींत म्हणून आपण अपेक्षा करीत होता त्याबद्दल सल्ला मसलत **करनेल कीटन्** (?) यांशी आमचें स्मरण न करितां जाहीर केली त्यामुळें आपलें काम लांबणीवर पडलें. यांत आपलीच चूकभूल आहे. इंग्रज हे बोलण्यात सत्य व दोस्तीमध्यें दृढ असतात. परंतु ते कोणाचे नोकर नाहीत. आणि म्हणून त्याच्याशी कोणीहि त्या मान्याने बोलणेंचालणें करूं नये. आम्ही कोणत्याहि वेळेस आपल्या इष्ट कामास तयार आहोंत. नेहमी खुशाल असावें. लिहिलें तारीख १२ माहे मे सन १७७६ इंग्रजी मुताबिक तारीख २१ माहे रबिलावल सन ११९० हिजरी.

---

**पत्रांक २३** ॥ श्री ॥ **बॉर्डेम्**

शके १६९८ ज्येष्ठ शु. ४ रा। २१।५।१७७६ इ.

**मे. हरिपंत बलाल फडके** यांस–आपणांवर ईश्वरी कृपा सदैव असो. मी आपणांस स्नेहधर्मपूर्वक कळवितों कीं, स्नेहपत्र पोहोचलें. त्यांतील मजकूर समजला. **कारनेल अपटन** यांच्या मार्फत आमचे लार्ड व श्रीमंत **पंडत प्रधान** यांच्यामधील बळकट दोस्तीच्या संबधांत आमच्याकडून तफावत होणार नाहीं ( वरिष्ठ अधिकाऱ्यांचा ) हुकूम व माझा हेतुहि असा आहे कीं, दोस्ती नेहेमी मजबूत असावी. जर पत्र प्रथम लिहिलें असतें तर फार चांगलें झालें असतें. पण कालच मी सरदारीचा ताबा घेतला आहे. माझ्या हातीं कारभार नव्हता. **दादासाहेबांची**

हजार, दोन हजार माणसें शहरात आलेली आहेत ही गोष्ट आपणांस कोणी तरी खोटीच कळविली आहे. दोनशेंपेक्षा जास्त माणसें दादासाहेबापाशी नसावीत म्हणून सक्त ताकीद आहे. व ती माणसें लढाऊ नाहीत. त्यांच्या जुन्या नौकर माणसांपैकी आम्हांस खबर न लागता आलेली असल्यास त्यास बाहेर काढून देऊ. ते लढाऊ नाहीत ते खिदमतगार व नोकरपेशाचे असतील. भेट घेऊन व मुजरा करून परत आपल्या देशी ते जातील. या वार्तेमुळे आपण शका घेऊ नये. असें लिहिलेले आहे की, चार माणसें शहरांत आहेत. त्याजबद्दल मला खबर नाही. त्या माणसांस हि परवानगीची खबर सुद्धा नसेल. मी व माझे अधिकारी केव्हाहि ते आमच्या अमलांत व आश्रयाला रहाणें–ही गोष्ट कबूल करणार नाहीत, अशी आपण खात्री ठेवावी. त्यांनी शहरात मुक्काम करू नये अशी आमची सक्त ताकीद आहे. कदाचित् चोरून येतील तर व आम्हास समजेल तर त्याचवेळी त्यास बाहेर–काढून देईन. खात्री असावी. यात तफावत होणार नाही. दादासाहेबाचे हत्ती उट व घोडे वगैरे-बद्दल लिहिलें होतें त्याबद्दल **मिस्टर गँबीर** यानी स्पष्ट उत्तरी कळविलें आहेच की, ते सर्व **दादासाहेबांच्या** मालकीचे आहेत. व आम्ही ते **लॉर्डच्या** हुकूमाशिवाय आपणास देऊ शकत नाही. आपली मर्जी असेल तर आमच्या **लॉर्डास** लिहावें. आज चार दिवस झाले, आपला माणूस **लखो पंडित** यांज-बराबर हर प्रकारची पत्रे पाठविण्याबद्दल मजकुराचे पत्र त्याजसमागमें आपणाकडे पाठविले आहे. आपण असेहि लिहिलेलें होतें की, "कांही गोष्टी लिहून कळविता येत नाहीत तरी आपण आपला एक विश्वासूक माणुस पाठवावा. अशा माणसाजवळ तो मजकूर सांगू." सबब **बापू कामत** यास आपल्या सेवेसी पाठवीत आहे. त्यास जे सांगणें ते सांगावें. रोज स्नेहाभिवृद्धि असावी. सौख्यवृद्धि असो तारीख २१ एकवीस मे, सन १७७६ इंग्रजी, छ० २ माहे रबिलाखर सन ११९० हिजरी.

---

**पत्रांक २४** ॥ श्री ॥ *** जॉन ब्रिस्टो.**

शके १६९८, श्रावण शु० १ ता १६।७।१७७६ इ.

**सवाई माधवराव पंडित प्रधान**–यास–विशेष. तिकडून लालपोश (दंगेखोर) वगैरे कांही मंडळी झांशीकडे जाऊन त्यांनी तेथें बंडाळी केल्याबद्दल मजकुराचे आपले पत्र पावले. मी याबद्दल **नबाबसाहेब वजीरुलमुमालिक** यांस कळवून बंडाळी थांबविली आहे. सदर पत्र पोहोचून फार आनंद झाला. मी आपल्या लिहिण्याप्रमाणें नबाब वजीरुल मुमालिक यांस वरील गोष्टीबद्दल लिहून [illegible]

* सदर **जॉन ब्रिस्टो** हा **नबाब वजीर** यांजकडे फैजाबादेस ब्रिटिश रेसिडेंट होता.

त्यांच्या व आपल्या दरम्यानचा स्नेह जुना असल्याबद्दल हि त्यास उत्तम रीतीनें समजाविले आहे. व सांप्रतहि सदर **नबाब** साहेबांच्या मनांत स्नेह व ऐक्य आहे. ईश्वरेच्छेनें महाराजा **पुरुषोत्तम पंडित** पोहोचलेले आहेत. ते **मरकल रावजी** (?) यांच्या कामाचा निवाडा करतील. प्रत्यक्ष भेट होईपर्यंत आठवणीची अपेक्षा करीत आहे. बहुत काय ?

**जे. बी.**

---

**पत्रांक २५** ॥ श्री ॥ **सयद नुरुद्दीन हुसेन**

शके १६९८ १७७६ इ.

**मुनशी नारायणराव किसन** यास-विशेष.- सरकारच्या इनामी काशीद जोडीबरोबर कृपापत्रें एका विनतिपत्रासह पोहोचली. इकडूनहि यापूर्वी दोन जोड्या रवाना झाल्या आहेत व आता हि एक जोडी रवाना झाली आहे. सरकारीकामात आपण कोणतेहि प्रकारें माघार येणार नाहीत अशी आशा आहे. कारण, हें काम पार पाडणें आपणासच हितावह आहे. असे काम केले पाहिजे की, आपण **बापूसाहेबाकडून** अगर जो कोणी पुढाकार घेणारा असेल त्याकडून अथवा या कामाच्या मालकाकडून '**सयद नुरुद्दिन हुसेन खान** आल्यावांचून जाहागीरी-संबंधीचें काम तडीस जाणार नाही,' अशा मजकुराचें पत्र लिहवून पाठवावें त्यास लौकर रवाना करावें. या बाबतीत आपलें व माझें परस्परात झालेले जे लिहिणें वाचणें व करार तो कायम होईल. या बाबतीत तिसरा माणूस जरी आला तरी हरकत नाही. कोणत्याहि गोष्टीमुळे अथवा प्रकारानें सरकारचा ज्यात फायदा आहे त्यांत माझाहि आहे. परंतु, परस्पर समजुतीप्रमाणें तुमचें काम पूर्ण ठेपेस लाविलेलें आहे. म्हणून आपण मुखत्यारपणानें जें ठरवाल तें मला कबूल आहे. या बाबतीत आपण **दादासाहेबांस** निक्षून लिहिलें पाहिजे कीं, लौकर पाठवावें. ज्यास्त लिहिणें नलगे. **भास्कररावजी** व **फत्तेचंद** यांस सलाम. ताजाकलम- **राऊत यशवंतसिंग** यांच्या कामासंबंधीहि समक्ष बोलणें झालें होतेच. सांप्रत त्यानेंहि **बापूसाहेब** व **श्रीमंत** साहेब यास पत्रें लिहिली आहेत व मुलूख व राज्याच्या हिश्शासबंधीं श्रीमंत **दादासाो** मालक आहेत ते वाटेल तें आमच्यापासून घेतील. व **महादजी शिंद्यांच्या** मुलखाजवळील **दादासाहेबांचा** जो प्रांत असेल तो दोघा राजांच्या संमतीनें मिळूं शकेल. हल्ली विशेषतः बुंदीचा राजा व **राजा अजवंत सिंह** हे हजर आहेत व त्याजजवळ विशेषतः **राजा राघवदास** व **राजा रामसिंग** हे आहेत. व किल्ले कोपाळहि त्यांच्या हातांत आहे. सध्यां त्याजपाशी आठ हजार स्वार आहेत. व आणखी जरूर तर वाटेल तितकी फौज जमा करतील. त्यांच्याजवळ

पुष्कळ इत्यादिहि आहेत. त्याची इतकी तयारी आहे कीं, **राजा रामसिंग** व **जनाब आली** यानीं **दादासाहेबांस** हिंदींत पत्र लिहिलेले आहे व त्यांत त्यांनी आज्ञा केली आहे की, त्याचा जबाब फारशीत लिहावा. कारण दुसऱ्या कोणी तें वाचू नये. म्हणूनच हिंदीत लिहिले कारण **दादासाहेब** स्वतः ते वाचतील. याउपरी 'आपण **जनाब आलीच्या** नव्या सनदेबद्दल मला लिहिले तर त्या बद्दल मी कांही कळविणें योग्य नाही. तुम्हीच **दादासाहेबांस** स्वतःच्या पत्रांत लिहावें,' असे तुमच्या लिहिण्यावरून मी लिहिले आहे. तरी तें त्यांच्या हाती देऊन बोलणें चालणें करावें. कळावें.

---

**पत्रांक २६** ॥ श्री ॥ **( वॉरन् हेस्टिंग्ज् )**
**इमादुदौलाबहादुर.**

शके १६९९ १७७७ इ.

(१) यास-विशेष-आपणाकडून एक पत्र कौलकराराप्रो शर्ती अमलांत आणून पूर्ण करण्याबद्दल व मुंबई गव्हर्नर व कौंसिल या संबधी तक्रार दाखविणारें व दुसरें पत्र फ्रेंच वकील पुण्यास येऊन तेथे त्याचा सन्मान झाल्याबद्दल वगैरे येऊन मजकूर समजला. यापूर्वी छ. ७ माहे शाबान रोजी लिहिलेल्या पत्रात बऱ्याच तक्रारीपैकी एकीबद्दल विशेषतः लिहिलेलें होतें, त्यावरून परस्पर करारमदाराप्रमाणें पक्केपणाने वागण्याचा या सरकारचा हेतु निःसंशय उघडपणें समजून आला असेलच म्हणून त्याबद्दल मी आतां पुन्हा लिहिणे अवश्य नाही असे समजून बाकीच्या गोष्टीबद्दल जबाब सदर पत्रातून देत आहे. आपले पत्र येण्यापूर्वीच फ्रेंच सरदार पुण्यास पोहोचल्याबद्दल व त्यास मुंबईजवळील बंदर दिल्याबद्दल व त्याच्याशी बोलणें चालणे होऊन कौलकरार झाल्याबद्दल वगैरे बातमी मला पोहोचली त्यामुळें मला फार आश्चर्य वाटले. ज्याच्या योगाने परस्पर फायदे आहेत अशा परस्पर करारमदारास अनुसरून अशा गोष्टी घडणें हें सुज्ञपणाचे कृत्य नाही असे आपणासहि समजून येईल. तथापि मला खात्री आहे की, अशा गोष्टीमुळे कोणत्याहि प्रकारे अडथळा येऊ शकणार नाही व केव्हाहि येणार नाही. आपल्या खुषखबरीचा चाहता असें मला समजून वरचेवर आनंदपत्र पाठवून आनंदवीत जावें.

डब्ल्यू. एच्.

ताजाकलम-कौलकराराच्या शर्ती अमलात आणण्यांत मी व कौंसिलचे साहेब केसाएवढी सुद्धां कसूर करणार नाहींत उलट आम्ही पक्के आहोंत. आपल्याहि नजरेत ही गोष्ट राहणे हें उचित आहे. बहुत काय लिहिणे ?

डब्ल्यू. एच्.

---

पत्रांक २७ ॥ श्री ॥ ( वॉरन् हेस्टिंग्ज् )

इमादुद्दौलाबहादुर.

शके १६९९ १७७७ इ.

**श्रीमंत रावसाहेब** ( ? ) यांस — विशेष — हिंदुस्थानाकडील कंपनीच्या मुलखात धामधूम करण्याचा इरादा असल्याबद्दल तपशीलवार हमेशा मला खबर समजल्यावरून अवश्य कर्तव्य म्हणून आमच्यासरकारच्या वरील प्रांताचें संरक्षण करण्याकरिता फौजेची टोळी पाठविलेली आहे. कदाचित् सदर टोळीचें कूच मराठा सरकाराच्या कांहीं प्रांतातुन होईल. सबब आपण परस्पर मैत्रीवर लक्ष्य देऊन आपल्या अंमलदाऱ्यास रस्त्यात तीस त्रास न होईल असे करून शिवाय शक्य ती मदत करण्याबद्दल लिहून ताकीद करण्याची मी आपणास तसदी देत आहे. असें केलें असतां सदर टोळी सुखाने इष्ट ठिकाणी पोहोचेल. आम्हीहि आमच्या टोळीच्या सरदारास परस्परस्नेहभावास अनुसरून सौजन्यानें वागण्याबद्दल सक्त ताकीद केलेली आहे. आपणामध्ये व आमच्या सरकारामध्यें झालेल्या शर्ती कायम तशाच ठेवणे हाच आमचा हेतु आहे व इकडून केव्हाहि कोणत्याहि कामांत कसूर होणार नाहीं. या बाबतीत आम्ही जसे कायम राहूं तसेच आपण हि हेच ध्येय ठेवाल अशी मला खात्री आहे बरचेवर पत्रद्वारे कुशलेच्छुस आनंदवीत जाणे हें स्नेहभावास अवश्य आहे. बहुत काय लिहिणे ?

डब्ल्यू. एच्.

---

पत्रांक २८ ॥ श्री ॥ (?)

शके १६९९ रा। २५।१।१७७८ इ.

**सेवकराम** यांसः—हुजूरच्या दरबारातून तुम्हास **गव्हर्नर जनरल मिस्तर हेस्टिन्** बहादूर जलादुज्जग याजकडे परस्पर प्रेम व दोस्ती याचा पाया मजबूत करण्याकरिता बंदर कलकत्ता येथें पाठविलेले आहे. सबब हे तुमचे कर्तव्य आहे की, सदर साहेब व त्याचे कौंसिल यांस इकडील सर्व गोष्टी उत्तम प्रकारें समजाऊन द्याव्यात. व बंदर सालशी सोडून देण्याबाबत सवालजबाब करावेत. व आज्ञापत्रा प्रमाणें **रघुनाथरावाबद्दल** दुरुस्ती करावी तुम्ही जे काही कराल तें हुजुरास मंजूर व कबूल होईल सदर लिहिल्याअन्वये तुम्हास या बाबतीत मुखत्यार नेमिले आहे. लिहिलें तारीख २५ जिल्हेज ११९१ हिजरी.

ता. २५ जिल्हेज सन ११९१ हिजरी रोजी **लाला सेवकराम** याच्या नावें **श्रीमंत पंतप्रधान** यांच्या मोहरनिशी केलेल्या मुखत्यारपत्राची नकल असे.

---

पत्रांक २९ ॥ श्री ॥ जॉन् अपटन्

शके १६९९ १७७८ इ.

मेहेरबान सज्जन कृपावत स्नेहाधार **बाळाजीपंडत नानासाहेब** यांस— सलाम उपरि—ज्याच्या कृपाळुपणास व मोठेपणास सीमा नाहीं अशा आपल्या सौख्य-पूर्ण दर्शनाची इच्छा अन्तःकरणापासून प्रकट करीत आहे. ईश्वरास नमन असो. काल रात्रि कलकत्त्याच्या वड्या कौन्सिलाकडून पत्र आलेले पोहोंचलें पूर्वी मी आपल्या इच्छेप्रमाणें खात्रीशीर केलेले होते त्यास अनुसरूनच सदरहु कौन्सिलानी आपल्या हेतूप्रमाणे कबूल केलेले आहे. मी ही शुभवार्ता म्हणून तावडतोब आपल्या सौख्यपूर्ण सेवेसी या स्नेहपत्रानें कळवीत आहे इश्वरेच्छेनें एक दोन दिवसांच्या अवधीत तपसीलवार कळविण्यात येईल किंवा ज्या वेळी श्रीमत **माधवराव अप्पासाहेब** याची स्वारी या शहरी येणार आहे त्या वेळी समक्षच सर्व गोष्टी सविस्तर पुढें मांडीन जास्त लिहिणें जास्त आहे. नेहमी सौख्यकाळ असो.

जे. अपटन्.

---

पत्रांक ३० ॥ श्री ॥ (वॉरन् हेस्टिंग्ज्)

इमादुद्दौलाबहाद्दर.

शके १७०० १७७९ इ

**मे० बाळाजी पंडित** यास—विशेष—तिकडील घडलेल्या गोष्टीबद्दल ज्या अफवा मला समजल्या त्या व त्याबद्दल माझ्या मनांतील गोष्टी मी आपणास लिहून कळविल्या आहेतच. तसेच मुबईच्या फौजेचे सरदार व आपण यांमध्यें जो कराररमदार झाला तो मला नामंजूर असल्याबद्दलहि स्पष्टपणे मी कळविलें आहेच ते पत्र पाठविल्यानंतर आपलें एक पत्र सदर कौलकराराच्या नक्कलेसह आलेलें मिळाल. त्यांतील मजकूर वाचून फारच सखेदाश्चर्य वाटले कारण, **कंपनीच्या** अधिकारांना कमीपणा आणणारें व इंग्रज नाव धारण करणाऱ्यालाहि हलकेपणा व बेअब्रू आणणारें असे हें कृत्य घडले. शिवाय याहिपेक्षां विशेष आश्चर्य हें वाटते की, ज्याला कोणत्याही प्रकारे अधिकार नाही अशा माणसाकडून आपणहि करारनामा कबूल करवून अशा शर्ती घातल्या को, त्या कबूल केल्या असता स्वतःस इंग्रज म्हणवून घेणाऱ्या माणसाने आपली बेअब्रु कबुल केल्याप्रमाणे आहे. कारण, सदर सरदार व त्याचे वरिष्ठ मुबईचे गव्हर्नर व कौन्सिल यासहि हिंदुस्थानच्या सरदाराशी कौलकरार करण्याचा कोणत्याहि प्रकारे अधिकार नव्हता ही गोष्ट आपणांस माहीत नव्हती असे नाही. याबद्दल आगाऊ खबर **कर्नल अपटन्** यास पाठविलें त्याच वेळी स्पष्टपणें आपणांस व इतर कारभारी मंडळास दिलेली होती. नाही तर

अशा बाबतींत मुंबईच्या कौन्सिलास व गव्हर्नरास अधिकार होता. कर्नल मजकूर यांस पाठविण्याचें कारण–त्यानी ( मुंबईकरांनीं ) रघुनाथरावाशीं केलेला कौल-करार रद्द करण्याकरितां व कंपनीच्या ताब्यांत असलेल्या हिंदुस्थानांतील मुलखा-संबंधी या कंपनीतर्फे पूर्ण अधिकार असलेले कर्नल मजकूर यांचे मार्फत ( पूर्वींचा ) कौल करार पुन्हां कायम करण्याकरितां–हेंच होय. याकरितां कर्नल मजकूर यांस पाठविण्याची जरूरी नव्हती. तळेगांवी केलेल्या करारावर ज्या सरदारानीं सह्या केलेल्या आहेत त्या लोकांस तसें करण्यास मुंबईचे गव्हर्नर व कौन्सिलाकडून कोणतेहि प्रकारें अधिकार नव्हता म्हणून तो केलेला करारनामा आम्हास कोण-त्याहि प्रकारें कबूल व मंजूर नाही. याकरितां कर्नल मजकूर यास पाठविणें अवश्य झालें. केलेला करारनामा जर कायम व मंजूर असतां तर इतकें करणे जरूर नव्हतें. सबब आतां मी पुन्हा लिहीत आहे की, केलेला तो करारनामा मुळीच कबूल व मंजूर नाही. तो खोटा व केवळ नामजूर आहे. व आपणांसहि या कामी तक्रार करण्यास आधार नाहीं. कारण, असला करारनामा आम्हास नामंजूर अस तांनाहि आपण त्यांस मानितां. हिंदुस्थानांतील राजेरजवाड्यांशी त्याची गादी कायम आहे तोपावेतों सख्यत्वानें वागावें अशी माझी मनापासून इच्छा आहे, ही गोष्ट सूर्याप्रमाणें उघड आहे. यापूर्वी आपणांस कंपनीच्या व इंग्रजांच्या कायमच्या दोस्तीच्या शर्ती कळविल्या आहेतच. त्या आपल्यास कबूल नसल्यास माझ्या हातून जें कांही निरुपायानें अमलात येईल त्याबद्दल माझ्यावर शब्द राहणार नाही. परंतु, माझी पक्की खात्री आहे की, आपण न्यायावर व परस्पर संबंधावर नजर देऊन उपरिनिर्दिष्ट शर्ती अमलात आणाल. व असें झालें तर परस्पर कायम दोस्तीचा पक्केपणा होईल व आपलें चांगलें नाव होईल. बहुत काय लिहिणें ?

डब्ल्यू. एच्.

---

पत्रांक ३१ ॥ श्री ॥ (?)

शके १७०१ फाल्गुन शु० ९ ता। १५।३।१७८० इ.

मे० पंडतसाहेब यांस—विशेष—" पंडित प्रधान व बंदगान जनाब आली यांमधील एकी इतकी आहे की, तीमध्यें कोणताहि भेद नाही. आणि म्हणून-च दक्षिण प्रांतात बंदगानआली व पंडित प्रधान याचा अमल चांगला पक्का आहे. असें असताहि अलीकडे दर्यावर्दी इंग्रजलोक दुष्ट हेतुपूर्वक खोडसाळपणा करण्याची इच्छा करतात. बंदगानजनाबानें त्यास तंबी देण्याचा कट केला आहे व त्याप्रों त्यानीं इकडे हुकूम केला आहे. त्याच्या हुकमावरून मुधोजी भोंसले व हैदरअलीखान यांसह एकमत करून अंग्रेजास तंबी देण्याच्या कटांत सामील झालों. थोड्याच दिवसांत बडेबडे सरदार फौज सरंजामासुद्धां गुज-

राथ जिल्ह्याकडे रवाना होतील व सदर **भोंसले** यांची फौज बंगाल्याकडे जाईल. व **हैदरअलीखान** हे मोठ्या फौजेसह चिनापटणास जातील " या मजकुराचें आपलें कृपापत्र आलें तें पोहोंचून अत्यंत आनंद झाला. वास्तविक पहातां, दक्षिण प्रांतांत **बंदगान हजरत** व **पंडत प्रधान** यांच्याशिवाय दुसऱ्या कोणाचीहि रियासत नाही. या खोडसाळ लोकांनी आपली पूर्वीची रयतेची वृत्ति सोडुन कांही कारणानें क्रोडो रुपयांची लज्जत प्रांतातून लागून व बळावून पहिली फराळाची चव लागल्यामुळें पुढील जेवणाची अपेक्षा करीत आहेत. ( नम्रवृत्ति सोडून गर्विष्ठ झाले आहेत ). जर आणखी कांही दिवस आपण डोळे मिटून बसलों तर या लोकांस उखडून काढणें फार मुशकिल होईल. साराश, जो बेत ( कट ) ठरविलेला आहे तो अत्यत उचित आहे. हा ठरविलेला बेत मनाजोगा सिद्धीस जाईल व त्यांत चुकभूल होणार नाही अशी मला खात्री वाटते. ईश्वरकृपेनें **बंदगानआली** हे व मी **पंडित प्रधानाचे** हितचिंतक आहोंत व दोघांत भेदभाव नाही. वरकड गोष्टी **जिवाजी पंडित** यास सांगीतल्या आहेत ते आपणांस कळवितील. मला आपण आपला एक हितचिंतक जाणून कृपापत्र पाठवून माझी आठवण होत असावी. बहुत काय लिहिणें ! सुखकाल व इष्टसिद्धि नेहमी असो.

---

**पत्रांक ३२** ॥ श्री ॥ **रतन बिन बुढण**
**सादुल्लाखान**

शके १७०३ भाद्र. शु. १४ रा. ११९११७८१ इ.

**श्रीमंत साहेब चिंतामण दीक्षित** यांस—विशेष—हुजूरसेवेसी पुन्हा विनंतिअर्ज की, अर्ज लिहिल्यानंतर **जनराल** मला म्हणाले की, 'तुम्ही **पेशवे** सरकारच्या हुजूर कळवावें की, ' जर **पेशवे** सरकार आमच्या पातशाहासी तह करतील व खुलदार ( ? ) **पूर्तेकेश** यांचा जरूरीचा खर्च देतील व मदतीची अपेक्षा करीत असतील तर आमचे पातशाहा जरूर मदत करतील.' मला बोलणें चालणें करण्यास अधिकार नव्हता म्हणुन मी त्यास उत्तर केलें की, " जर आपल्या पातशाहास तह व दोस्ती कबूल असेल तर आमचे सरकार **पेशवे** साहेबहि त्यात कसूर करणार नाहीत. परंतु, सध्या **पेशवे**सरकारास मदतीची जरूरच नाही. कारण, हल्लीं **इंग्रजांशीं** बिघाड झाल्यामुळे दक्षिण प्रांतांतील सरदारांवर व पदरच्या मंडळीवा **पेशव्यांची** हुकमत आहे, म्हणून **पेशवे**सरकारानी सदर सरदारांस हुकुम केलेला आहे कीं, '**इंग्रजांस** मानू नये. व येथें फौज तयार करावी. ' " श्रीमंताच्या इच्छे-प्रमाणें तीन लाख फौज तयार होऊं शकते आहे म्हणून दुसऱ्याच्या फौजेचेर जरूरी कांहीं नाही अशी आपण खात्री ठेवावी. याप्रमाणे नेहमी माझे सवालजबाब **जनराल**साहेबाशी होत असतात. आणखी अशी खबर समजते की, **हैदराच्या**

बहुतेक सरदारांस मारून त्यावर इंग्रजांनी विजय मिळविल्याबद्दलची खबर खरी खोटी आहे याबद्दल जनरालसाहेब यांस विचारलें. त्यावर जनरालनें उत्तर दिलें की, 'अजून हैदराच्या सरदारांस मारल्याबद्दल पक्की खबर आम्हास समजली नाही व पत्रहि नाही.' यावरून सदर खबर नुसती गप्प आहे. हैदरच्या लष्कराकडून जनरालकडे पत्र ज्या वेळी येईल त्या वेळी तपास करून तपशीलवार हकीकत आपणांस कळवीन.

---

**पत्रांक ३३** ॥ श्री ॥ (?)

शके १७०३, आश्विन शु. ७ पा २४।९।१७८१ इ.

**श्रीमंतसाहेबांचे** सेवेसी— महाराजांच्या सेवेसी पुन्हा विनंति की, खुष्की-मार्गानें **हैदरचें** लष्कर कुवा (?) मध्ये पोहोंचल्याबद्दल पुढीलप्रमाणें खबर पोहोंचली ती अशी, कलकत्याचे गव्हर्नर **मिस्तर हेस्टींन** यानी **कर्नेल कूट** याच्या मदतीकारितां लष्कर पाठविलें आहे **हैदर** व कर्नेल मजकूर यामध्यें निकराचे युद्ध झालें. या लढाईत **हैदरचा** मुलगा मारला गेला व **मूसीलाली**हि तोफेच्या गोळ्यानी मारला गेला व **नबाबानें** पूर्ण पराजय झाला जें कळलें तें आपल्या सेवेसी कळविलें आहे. याउपर आपल्या आज्ञेची वाट पहात आहे. आपल्या हुकमा-प्रमाणें अमलात आणीन जरूर तें कळविले आहे

---

**पत्रांक ३४** ॥ श्री ॥ (?)

शके १७०३ ? १७८१ इ.

**मे० सखाराम पंडित** यास— विशेष- आपणांस नबाब इमादुद्दौला **मिस्टर हेस्टिन्** बहादूर जलादूरजंग यांनी बंगाल्याहून पाठविण्याकारितां दिलेली पत्रें त्यांच्या आज्ञेवरून हरकाऱ्याच्या हाती पाठविली आहेत. आपणास पोहोंचतीलच. बहुत काय ? आपण सुखी असा.

---

**पत्रांक ३५** ॥ श्री ॥ **डी. वॉथर्स्टन्**

शके १७०४, चैत्र शु० ३ रा १७।३।१७८२ इ

**पंडतसाहेब** यास— विशेष- दर्शनेच्छा दाखवून मुद्याकडे वळत आहे. आपणापासून रवाना झालों तों आज तारीख २ रबिलाखर ११९६ शनवार रोजी परमेश्वरकृपेनें खुशालपणे मजल करीत पनवेलबंदरी पोहोंचलों. व लागलीच जहाजा-वर स्वार होऊन मुंबईबंदरी जाऊन **जनराल गॉडर** यास भेटत आहे आपलें पत्र वाचून त्याचें उत्तर लिहवून रवाना करीत आहे. मला ज्याबद्दल कौतुक वाटतें

त्या आपल्या रुपासांगर अंतःकरणाचें आविष्करण मी करीन. परस्परसंमत गोष्टी इच्छेप्रमाणें अमलांत येतील व दिवसानुदिवस परस्पर एकीचा व मैत्रीचा पाया बळकट व वृद्धिंगत होईल वरकड, मी आपणांस कुशलपत्रें नेहेमी लिहीत जाईन त्यांचीं उत्तरें आपणाकडून कृपेनें लिहून यावीत. कारण पत्र म्हणजे एक भेटीचा उत्तम प्रकार आहे व तें एक स्नेहाभिवृद्धीचें साधन आहे. माझ्या बरोबर असलेले आपले **बनुपंडीत** व नोकर चाकरमाणसें अज्ञन आहेत त्यास रवाना करीत आहे आपलेकडे येऊन पोहोचतील बहुत काय लिहिणें

**डी वॉथस्टन्**

---

**पत्रांक ३६** **॥ श्री ॥** **सी. मॉर्गन्**

शके १७०४ १७८२ इ.

**मे० नानासाहेब** यासी— आपल्या अत्यंत सुखकारक भेटीची अपेक्षा दाखवून आपणास जाहीर करण्यात येते की, यापूर्वी इकडून एक पत्र पाठवून त्यांत मी पावसाळ्यानंतर इंग्रजी फौजेसह येथून यमुना नदीकडे जाण्याबद्दल व **पेशवा**-साहेबाच्या व आपल्या सहीशिक्क्यानिशी राहदारीचे दस्तक पाठविण्याबद्दल विनंति केलेली होती. त्याच्या उत्तरी आपलेकडून असा जबाब आला आहे. " हल्लीं राव **महादजी शिंदे** याजकडून पत्र आलेले आहे कीं, 'इंग्रजी फौज बंदर सुरत प्रांतात आहे ती वेळेस उपयोगी पडेल.' त्यावर त्याचें उत्तर व इतर कित्येक मनसुब्याच्या गोष्टी त्यांस लिहिल्या आहेत त्याच्या उत्तराची अपेक्षा करीत आहो. त्याचें उत्तर आल्यानंतर आपणास कळवू इंग्रजी फौजेचें कूच पावसाळा सपणे व **महादजी शिंद्यांचें** उत्तर येणें यावर अवलंबून आहे " असा त्यात मजकूर आहे. महाराज, **मिस्टर अंडरसन**साहेबाकडून लिहून आल्यावरून असें समजले की, राहदारीचे दस्तक देण्याबद्दल आपणास पत्र लिहिलेले आहे. सबब तसदी देत आहे की, राहदारीची दस्तके आपण मजकडे पाठवावीत. म्हणजे फक्त पावसाळ्याशिवाय इतर अडचण कूच करण्यास राहणार नाही. आपण कुशलपत्र पाठवून खुष करावें अशी उमेद आहे बहुत काय ? चिरकाल सुखी असा.

**सी. मॉर्गन्**

---

**पत्रांक ३७** **॥ श्री ॥** **सी. मार्गन्**

शके १७०४ फाल्गुन वा। ८ पो। २५।३।१७८३ इ.

मे. **बाळाजीराव जनार्दन नानासाहेब** यास—विशेष—हें पत्र लिहिण्यापूर्वी आपल्या पूर्वीच्या पत्राचें उत्तर लिहिणें अवश्य होतें. तथापि आता मोठ्या

आनंदानें तें करीत आहे. **रावसाहेब माधवराव नारायण पंडत प्रधान** साहेब यांच्या लभाबद्दल अभिनंदन करितों. व ईश्वराजवळ मी प्रार्थना करितों की त्यानें त्यांस व आपणांस सुखी व चिरायु करावें. हल्ली **हैदरअलीखान** मरण पावले असल्यामुळें आपणांस चांगली संधि मिळाली आहे. **मिस्तर अंडर्सन** व **महादजीराव शिंदे** यांच्या मार्फत त्याबद्दल बोलणे सल्लामसलतीबद्दल झालेलें आहे तें आपण कबूल करणें फारच श्रेयस्कर होईल. कारण, त्यात आपलें परस्पर कल्याण आहे. मी तर शिपाई माणूस आहे परंतु परस्पर कल्याणाची अपेक्षा आहे म्हणून मी हें जाहीर करीत आहे. मी एक हितचिंतक आहे. आमच्या मालकाची सेवा व आज्ञापालन करण्यात कसूर केली तर तें मला उचित नाही. इतर सगळ्या गोष्टींपेक्षा आपल्या धन्याच्या अब्रूवर लक्ष्य देणे ही गोष्ट विशेष आहे. आपल्या राज्याविषयी खरेपणा व निष्कपटीपणा जो कांही मजकडून आपल्या नजरेस दिसून आला त्यात कांही अंतर नाहीं असे या पत्रावरून आपणास दिसून येईल. आपणास कळविणें मला अवश्य आहे की, आपले दोन हजार पेंढारी इंग्रजसरकारच्या परगण्यात आले आहेत परगणे मलसर व महू व बारडोली यातील गांवें त्यांनी उध्वस्त केली यामुळें मी आपल्या स्वारास कंपनीच्या प्रांतातून त्यास हद्दपार हांकून देण्याबद्दल हुकुम केला. आपल्या ठिकाणी आनुवंशिक व जातिसिद्ध गुण असे आहेत की, जी ही क्षुद्र गोष्ट घडली ती खरोखर आपल्यास माहितहि नसेल अशी मला खात्री वाटते, सबब आपणाकडून कायदेशीर शासन त्यास अवश्य केलें जावें. व दुःखितांस खुषी करावें. तरी या विनतीप्रमाणे जरूर कराल अशी आशा आहे. माझी नेहमी नजर सत्याच्या मार्गावर आहे. बहुत काय तसदी देऊं ?

सी. मार्गन्
कर्नल.

---

**पत्रांक ३८** ॥ श्री ॥ **मॉटिनी.**
शके १७०५ १७८३ इ.

**श्रीमंत रावसाहेब** (?) याचे सेवेशी–सलाम, विशेष, आज आठ दिवस झाले तुमचे पत्र आलें तें **भोसी** यास दिलें. मी पत्राचा जबाब लिहून ठेविलेला आहे परतु आपल्या पत्राची फार वाट पहात आहे, **गणेश पंडित** हे आज उद्यां वरील पत्राचें उत्तर लिहितील. सबब पत्राचे उत्तराची अपेक्षा आहे. सदरहु पत्राचें उत्तर पाठविण्यास विलंब करणें हें बरें नव्हे माझ्या पत्राचें उत्तर व आपल्या पत्राचें उत्तर अशी एकठिकाणी पाठविली तर काम लवकर होईल.

मॉटिनी

---

पत्रांक ३९ ॥ श्री ॥ जे. अपटन्
शके १७०५ १७८३ इ.

मे० **बापू सखाराम पडत** यास—सलाम उपरि आपल्या पूर्ण दिव्य भेटीची मी मनापासून इच्छा प्रकट करीत आहे. आपले कृपापत्र पोहोचून त्यांतील आपले प्रकृतीचे कुशलवर्तमान समजून विशेष समाधान झालें ( माझे ) महाराज ! इकडील सर्व गोष्टी **गवर्नर जनरल** व वडे कौसल याचे सेवेसी निवेदन केलेल्या आहेत व सर्व तक्रारी व म्हणणें याबद्दल तपसीलवार तपास केला आहे. व गव्हर्नर जनराल त्याप्रमाणें आपणांस लिहितील. परंतु आश्चर्य वाटतें की, अद्यून तीन लाखाच्या मिळकतीचा निकाल लागलेला नाही. मी चनारगडाच्या सरदारकीवर कलकत्याहून रवाना होऊन काही दिवसापासून सदर गडावरच येऊन राहीन आपलें कुशल वर्तमान व खुषखबर ऐकून वरचेवर आनंद व समाधान होणार आहे. मात्र दोन्ही सरकारामधील कामाकाजाच्या बाबतीत आपण नेहेमी गवर्नरसाहेबास लिहालच. आपला हा कायमचा एकनिष्ठ स्नेही आपले स्मरण करण्यांत नेहमी दंग असतो. बहुत लिहिणें बहुत आहे. इष्ट सिद्धि व सौख्य नेहेमीं असो.

जे अपटन्

---

पत्रांक ४० ॥ श्री ॥ बॉडॅम्
शके १७०५ माघ शु॥ ३ रा॥ २५।१।१७८४ इ

**श्रीमंत माधवराव नारायणराव पंत प्रधान** याचे सेवेसी—विशेष, बंदर सुरत येथील रहिवाशी, सरकार **कंपनीचा** नोकर **रुस्तुमजी** याच्या मालकीची किश्ती ( मचवा ) महालक्ष्मी नावाची ही आमचेपासून व सदर **रुस्तुमजी**-पासून ( कोणी ) पकडून वसईस नेलेली आहे. सदर किश्तीबद्दल खुलासा करण्यासाठी मी गतवर्षी वसईच्या सुभेदारास लिहिलेले होते. परंतु, त्याच्या उत्तरी सुभेदार मजकुरानें 'सदर किश्तीमध्ये जुने चणे ( फोल ) होते म्हणून ते परत करण्याकडे लक्ष्य दिलें नाही' असे कळविले. पुन मी त्या सुभेदारास 'जे चणे किश्तीमध्यें आहेत ते खरोखर चुकभुलीनें आलेले असतील कारण तिच्या मालकाजवळ पुष्कळ किश्त्या आहेत व फोल ( चणे ) हि पुष्कळ आहेत' असे लिहिले. सुभेदार मजकूर यानें लिहिलें की, "**पेशवेसाहे**बांच्या आज्ञेशिवाय त्या किश्तीची सुटका होणार नाही." सबब मी हें स्नेहपत्र आपणास लिहून तसदी देत आहे की, आपण कृपा करून 'सदर किश्ती, त्यांतील भरलेल्या मालासह व इतर जिनसासह, मालकास परत यावी' या मजकुराचे आज्ञापत्र पाठवावे. गैरवाजवी रीतीनें सदर किश्ती

पकडली गेली असल्याचे उघड असल्यामुळ तिच्या मालकास नुकसानीचा बोजा फार झाला आहे. कळावे बहुत काय लिहिणें ?

आर. एच्. बॉडॅम्
२५ जानें० १७८४
पेशवे यास.

---

**पत्रांक ४१** ॥ श्री ॥ **सयद नुरुद्दीन हुसेन**
शके १७०६ चैत्र वा॥ १४ पा॥ १८।४।१७८४ इ

**कारभारी नानासाहेब यांसः—**

सलामत, आपले थोर कृपापत्र उत्तम वेळी पावून फार आनंद झाला. आपण मला बोलवण्याची थोर आज्ञा केली होती त्याबद्दल मी आपण माझी आठवण केल्याबद्दल फार आभारी आहे व माझीहि इच्छा अशीच होती की, आपल्या सेवेसी हजर होऊन स्वतःचा हेतु साधावा परंतु, मी येथे खिन्न होतो ईश्वरकृपेनें लवकरच आपल्या सेवेसी हजर होऊन धन्य होईन ( येथे ) अवश्य गोष्टी उरक-ण्यास तीन चार दिवस लागतील. ( परंतु या सर्व गोष्टास ) प्रकृतीचे स्वास्थ्य जरूर आहे. आपला काल सुखात जावो.

---

**पत्रांक ४२** ॥ श्री ॥ **सयद नुरुद्दीन हुसेन**
शके १७०६ चैत्र व० १४ पा॥ १८।४।१७८४ इ०

**मे० गोपाळपंडतसाहेब** यास– विनंति उपरि. कारभारीसाहेबाचे माझ्या नावें पत्र उत्तरी आले ते पोचून फार समाधान झालें. परंतु, **मुनशी**साहेब व मी याचे दरम्यान बंधुत्वाची आठवण देणारा जो स्नेह ( असावयास पाहिजे ) तो आपणास माहीत नाही. श्रीमंत सरकाराचा पत्रे माझ्याकरिता येतात त्यात रफअत व सियादत निशान अशा पदव्या असतात व आणखीहि मजजवळ **नानासाहेबांची** पत्रे आहेत. त्यांतहि नेहमी मेहेरबान असा शब्द असतो **तात्यासाहेबां**च्या तोंडुन आपलीहि प्रशंसा ऐकण्यात आली. ज्या प्रकारचा स्नेह आपण ठेवता त्यास अनुसरून आमची अब्रू वाढविण्यात आपण विशेष काळजी घेणे जरूर आहे कारण की, हे काम आपल आहे थोड्याच दिवसात आपल्या भेटीचा लाभ होईल. येथे मी एकटाच असल्यामुळे खिन्न आहे. मित्राच्या सहवासात कालक्षेप समाधानांत होईल. आजारी असल्यामुळे घोड्यावर बसतां येत नाही व जरूरीचे जिन्नस विकत घेता येत नाहीत म्हणून तीन चार दिवस उशीर होईल. यानंतर मला विशेष पत्रें पाठवून उत्तर घेत असावें.

---

**पत्रांक ४३** ॥ श्री ॥ **सयद नुरुद्दीन हुसेन**

शके १७०६ वैशाख शु० ८ ता २७।४।१७८४ इ

**कारभारीसाहेब** यास- विनंति उपरी यापूर्वी माझ्या येण्याची खबर व **श्रीमंत**साहेबास देण्याकरिता एक लखोटा असे आपल्या सेवेसी रवाना केला आहेच त्याचे उत्तरी आज्ञा झाल्याप्रमाणे अमलात आणले आहे. व मुबईसहि त्यातील मार कळविला आहे. **जनराल**साहेबानी लिहिले आहे की, हल्ली उष्णता फार आहे **नानासाहेबांनी**हि परत लवकर येऊ नये म्हणून पुण्यास कारभारीसाहेबाची स्वारी येण्याची वाट पहात आहे आपण येथे जव्हा याल त्या वेळी भेटीचे सुख मिळेल. वरील गोष्टीसंबंधी तपसीलवार **अमृतरावसाहेब** यास कळविलें आहे त्यानी हुकूम केला की, तावडतोब मुबईकडे कूच करावें. जेव्हा लष्कर पुण्यास येईल तेव्हा ( तुम्हास ) येता येईल. त्याच्या हुकुमाप्रमाणे कूच केले आहे. आपणास कळावें म्हणून लिहिले आहे आज मुक्काम .. .. गावानजीक आहे उद्या पुढे जाऊ थोडक्याच दिवसात **जनराल**साहेबाकडे **मुबईस** जाऊन पोहोंचू.

---

**पत्रांक ४४** **सयद नुरुद्दीन हुसेन**

शके १७०६ वैशाख शु० ८.

ता २८।४।१७८४ इ

**कारभारी नानासाहेब** यास.—

विशेष- यापूर्वी आपल्या सेवेसी एक विनंतिपत्र पाठविले होते त्याच्या उत्तरी आमची आठवण केली ते समजले प्रवासास साहित्य ना तयार [illegible] व त्याबद्दल **जनराल** साहेबास पत्र लिहिले [illegible] लष्कर निघण्याची [illegible] होता त्या-दिवशी त्याजकडून उत्तर पोहोचले त्यात लिहिलेले होते , 'सध्या [illegible] आहे. जव्हा **नानासाहेब** परत येतील तेव्हा [illegible] पुण्यात च मुक्काम करावा ' हा हकीकत मी **राव अमृतराव** [illegible] कळविली त्यानी आज्ञा केली की, "मुबईकडे तुम्ही कूच करा [illegible] **नानासाहेब** परत येतील तेव्हा तुम्ही पुन्हा यावे " याप्रो [illegible] **दादासाहेब** [illegible] पाच मजकुराचे पत्र लिहून द्यावें" या पत्रानतरहि मजकूर [illegible] वाट पहात कूच करीत ईश्वर कृपेने आता मात्र करीच झालेला आहे [illegible] करीत कळावे म्हणून लिहून पाठविले आहे आयुष्य व बेहद [illegible] होय.

---

**पत्रांक ४५** ॥ श्री ॥ **बॉडॅम्**

शके १७०६ वैशाख शु० ९

ता २९।४।१७८४ इ

**पेशवासाहेब अजम सवाई माधवराव नारायण पंत प्रधान** यांचे सेवेसी

—विशेष—परस्पर घडून आलेल्या ताज्या स्नेहाच्या वृद्धिकरिता एक महिन्यापूर्वी सियादत व निजाबत निशान—सय्यद नुरुद्दिन हुसेन खान या नावाचा कुलीन, इंगितज्ञ व आमचा विश्वासूक असा माणूस यास तथे पाठविलें आहे. जुनी वहिवाट अशी आहे की, सरकारचा वकील तेथे असावा. व सध्या आपला वकील येथे हजर आहे. सदर वकील येथे राहण्यास आल्या वेळे पासून त्याची शक्य ती व्यवस्था अमलात आणतो. हेतु हा की, दोन्ही सरकारात मनापासून दोस्ती आहे हें लोकांस जाहीर व्हावें. खान मजकूर यानी पुण्यास पोहोचल्यावर मदारुल्‌महाम ( कारभारी नाना फडणवीस ) याची स्वारी सैन्यासह पुण्याबाहेर गेली असल्याबद्दल कळविले आहे. व त्यानी लष्कराकडे जावे किंवा पेशवेसाहेबाजवळच राहावे याबद्दल माझा हुकूम मागितला. "गरमीचा काल असल्यामुळे व पावसाळा नजीक आल्यामुळें मदारुल्‌महाम हें बहुतेक कामे आटोपून लवकर परत पुण्यास येतील व मोकळ्या मनाने सरकारच्या कामात डोकें घालतील. तरी त्यावेळी तुम्ही त्याचे सेवेसी जाऊन सरकारानी सोपविलेल्या कामाबद्दल प्रश्नोत्तरें करावींत याकरिता पुण्यासच रहावें." म्हणून मी त्यास हुकूम केला आहे. व माझ्या मनातील हेतु असा होता कीं, पुण्यात मुक्काम करून दोन्ही सरकारच्या पत्राची पोहोच माझ्या मार्फत व्हावी. काल खान मजकूराचे पत्र पावले. त्याचा हेतु असा दिसतो की, काही कारणाशिवाय आपण जाऊ नये. पुण्याचे कारभारी मडळींनी खान मजकूर यांस मुबईस जावें म्हणून ताकीद केली आहे. पेशवेसाहेब, ही गोष्ट वहिवाटिच्या विरुद्ध घडून येणे व खान मजकुराबरोबर पाठविलेल्या पत्राचें उत्तर न येणे या गोष्टीचें फार आश्चर्य वाटतें. स्नेह, एकी, नेकी, व परस्पर सबध याचें दृढीकरण करण्याचा माझा हेतु आहे. परतु या वरील प्रकारच्या ( पत्रोत्तर न येणे व खानास मुबईस जाण्याची ताकीद करणे ) गोष्टीवरून कारभारी मडळी त्याच्या अगदी विरुद्ध अमलांत आणण्याची व मन कलुषित करण्याची इच्छा करितात असे समजून येतें. आपल्या सेवेसी ( आमच्या ) वकीलाची शिफारस व आपलेकडील वकील जो येथ आलेला आहे त्याच्याशी आमची वागणूक याबद्दल लिहिण्यात येत आहे. आमच्या वकिलाशी या प्रकारची अयोग्य वागणूक केलेली आहे ती आपल्या हुकमावांचून व लष्करावरोबर गेलेल्या मदारुल्‌महामानाहि माहित नसेल अशी मला खात्री आहे. सबब आपल्या सेवेसी विनति ही की, हें स्नेहपत्र पोहोचताच पुण्याच्या कारभारी मडळास सक्त ताकीद द्यावी की, "येथून पुडें कोणत्याहि प्रकारे आमच्या माणसाच्या बाबतीत खलेल व अडचण हरकत करू नये व भलतीच गोष्ट बोलू नये" आमचा माणस पुण्यास राहूं नये असे आपणास पटत असेल तर तसेंच इकडे

कळवावें म्हणजे त्यास अनुसरून वागू. सौख्याभिवृद्धि होवो यापेक्षां जास्त काय लिहावे ? सर्वदा सुखकाल असो. ईश्वरी कृपा असो.

**पेशवे यांस** **आर्. एच्. बॉडॅम्**
**मुंबई** ता. २९ एप्रिल १७८४ इ.

---

**पत्रांक ४६** **॥ श्री ॥** **बॉडॅम्**
शके १७०६ आषाढ शु० ५ रा २३।६।१७८४ इ.

**श्रीमंत माधवराव नारायण पंतप्रधान** यांचे सेवेसी— विशेष— आपलें कृपापत्र पोंचले पण्याहून **सय्यद नुरुद्दीन हुसेनखान** याच्या रवानगी-बद्दल वगैरे तपशीलवार मजकूर समजला. आपण पाठविलेल्या पत्राकडे लक्ष्य देण्यात माझेकडून कदाचित् काहीसा हलगर्जीपणा झाला असावा. आपणां परस्परांत असलेली मैत्री नित्य वाढविण्यात मी पूर्वीप्रमाणेंच तत्पर आहे. आपल्या पत्रामुळें फार आनंद वाटला. आपल्या हेतूप्रमाणें गोष्टी अमलांत आणूं. हल्ली आपल्या आज्ञेप्रमाणें **खान**मजकूर हे आपल्या सेवेसी पोहोचून माझ्या गरजेच्या गोष्टी निवेदन करतील. यापूर्वीहि आपणास पत्र लिहिलेले आहे तेहि ते आपणांस सादर करतील. आपल्या चौथाईबद्दल पत्र माझ्या नावें आलेले यासोबत जोडलेलें आहे. सरकारच्या ( आपल्या ) नोकरानी केलेल्या तक्रारी ऐकून मनास अमळ वाईट वाटले. परंतु, सोबत पाठविलेली नक्कल आपण मननपूर्वक वाचून पाहिली असतां माझ्या वाईट वाटण्याचे कारण आपणास बरोबर समजून येईल. सुरत बंदरावरील सत्तेबद्दल **सुरतेच्या नबाबांनीं** तीन वर्षांपूर्वी केलेला निकाल पूर्ण बारकाईनें चौकशी करून आपल्या समजुतीप्रों केलेला आहे. परंतु, श्रीमंत **माधवराव पेशवे-साहेब** व मयत **दामाजीराव गायकवाड** याचा कज्जा वेगवेगळा होता ही गोष्ट त्यानी लक्ष्यांत पूर्णपणे न घेतल्यामुळे तो निकाल मुद्यास धरून नाही. कोण-त्याहि कामांत दोन पक्षाच्या माणसांच्या मान्यतेशिवाय मान्यता समजणे हें आश्चर्य आहे. इतर माणसाच्या अभिप्रायावरून आपण जर चालू व्यवस्थेत ढवळाढवळ केलीत तर आपल्या सत्तेची घडी बिघडेल. त्या परस्पर कज्ज्याच्या बाबतीत आणखी खोल चौकशी आपण केली तर बसलेली घडी मोडून जाईल. वरकड, तालचेरी येथील रहिवासी **गंजीमुसी** याची **कादरी** नांवाची गुराब, जिच्यावर इंग्रजी निशाण व कौल होता, ती **धुळपराव** यानी जप्त करतांना अग्रेजी निशाण व कौल नव्हते म्हणून ती सोडली नाही असे ते जाहीर करतात. परतु आपल्या परस्परांतील दोस्तीस अनुसरून मी हक्कानें ही गुराब इंग्रजांचा आहे असें म्हणत आहे. याबद्दल हकीकत कळविण्यास तालचेरीस लिहिलेलें आहे. सबब या पत्रानें

आपणास तसदी देत आहे की, तिकडील उत्तर येईपावेतो मदारहु मालासह गुराब सुरक्षितपणें अमानत ठेवण्याबद्दल आपणाकडुन हुकूम व्हावा. विशेष काय लिहावे !

पेशवे यांस                                   आर् एच् बॉडॅम

मुंबई २३ जून १७८४
( सही सेक्रेटरीची )

---

**पत्रांक ४७**                    ॥ श्री ॥                    **बॉडॅम्**

शके १७०६ श्रावण शु। ८                    ता। ८। १७८४ इ

श्री० **माधवराव नारायण पंडत प्रधान** याचे सेवेसी. विशेष अलाकडे येथील अनेक हकीम व वैद्य याना एकमताने, बाणकोट येथील गरम पाणी आजारी असलेल्या काही मातबर इसमास हितावह आहे व त्याकरिता तेथे त्यानी जाणे जरूर आहे, असा विचार ठरविला आहे व त्याप्रमाणे सल्ला दिला आहे तरी विनंती केली जात आहे की, आपण कृपा करून महाडच्या सुभेदारास निक्षून ताकीद करावी की यानी पत्राडलेले हे किंवा इतर लोक तेथे येऊन राहतील अगर घर बांधतील तर त्यांस त्यांना हरकत करू नये, व ते राहतील तोंपर्यंत त्यास तसदी देऊ नये अशा प्रकारच्या अवश्य गोष्टीत पेशवे सरकारानी पूर्वी कृपा केलेली आहे परस्परांतील अकृत्रिम स्नेहावर नजर देऊन याही कामी आपण कोणत्याहि प्रकारची हरकत करणार नाही असी खात्री वाटते बहुत काय लिहिणे ?

लिहिले तारीख २१ माहे रमजान                    आर्. एच् बॉडॅम्
११९८ हिजरी.                    **मुंबई, ८ आगष्ट १७८४**

**सवाई माधवराव नारायण पेशवे, यांस**
**सी.—**

---

**पत्रांक ४८**                    ॥ श्री ॥                    **बॉडॅम्**

शके १७०६ आश्विन व० ६                    ता ४।१०।१७८४ इ.

**मदारुल् महाम यांसः—**

( सदर पत्रात कोणीतरी मयत झालेल्या इसमाचे मरणाबद्दल रीतीप्रमाणें खेदप्रदर्शक मजकूर लिहिलेला आहे. परंतु, त्यात कोण गृहस्थ मयत झालेला आहे याबद्दल मुळीच उल्लेख नाही पत्रातील मजकूर अबुल् फजल् या ग्रंथांतील उताराच आहे. म्हणून याचे भाषांतर केलेले नाही. )

---

**पत्रांक ४९** ॥ श्री ॥ **बॉडॅम्**

शके १७०६ कार्तिक शु० ४ गा १८।१०।१७८४ इ

**श्रीमंत माधवराव नारायण पंत प्रधान** याचे सेवेसी— विशेष.

ता० ५ माहे जिल्काद रोजी लिहिलेल्या स्नेहपत्रात राजपुरीबद्दल हकीकत कळविलेली आहेच त्यावेळी पाठविलेल्या पत्राचे उत्तर अद्याप पावेतो पाठविण्याची आपणाकडून कृपा झाली नाही हल्ली **अबदुल रहिमखान** याने मदतीबद्दल आमचेकडे पुन्हा मागणी केली कारण त्याची व **कंपनी** इंग्रज बहादर याची जुनी अकृत्रिम दोस्ती आहे इतर मार्गाने मला असे समजले आहे की, आपल्या फौजा **सय्यदी अबदुल रहिमखान** याच्या सरहद्दीवर लढाईकरिता जात आहेत परंतु या वार्तेवर माझा भरवसा बसत नाही कारण, **कंपनी** अंग्रेज बहादराशी असलेल्या आपल्या स्नेहामुळ मला अशी खात्री आहे की, माझ्या पत्राच्या उत्तरी आपण याच्यासारख्या माणसाबद्दल काहीहि विरुद्ध लिहिलेले नव्हते इतकेच नव्हे तर आपल्या सुर्यानेच **गोविंद शिवराम** याच्या मदतीने इंग्रजक**पनी** बहादराशी यांचे मध्यस्त्व जमले याशिवाय मीहि मशारनिल्हेच्या बाबतीत स्वतंत्र्या पत्रात लिहिले होते की, **सयदी अबदुल रहिमखान** इंग्रज**कपनी**च्या अकृत्रिम स्नेह्यापैकी एक आहेत ही गोष्ट आपणास निवेदन करणे जरूर आहे आपण व **सयदी** मजकूर याजमध्ये काही मतभेद झाल्यास त्याचा निकाल करणे हे माझे कर्तव्य आहे. या कामी आपण खात्री बाळगावी की, मी पूर्ण निःपक्षपातपणाने व न्यायाने आपणा परस्परात समाधान करण्याकरिता विशेष खटपट करीन जर कदाचित् त्याची आपल्या विरुद्ध प्रवृत्ति दिसली तर काही तपास न करिता आम्ही दम धरणार नाही वरकड, आपणास कळविणे मला अवश्य वाटते की, कदाचित्, इंग्रजसरकारावर कधी हल्ला आला असता मदतीकरिता आपणास कळविण्यामध्ये मी जर डोळेझाक केली तर माझ्या अधिकाराला मी नालायक होईन. **चार्लस करमलीन** (?) याच्या अमलातील करारमदाराप्रमाणे मशारनिलेस ( आमच्या ) सरकारानी मदत करणे योग्य आहे. परंतु अलीकडील **महादजी शिंद्यांचे** मार्फत जो करारमदार झाला आहे त्याप्रो अमलात आणलेले आहे. हाच मार्ग कायमचा ठरलेला आहे. जो दोघाचा शत्रु अथवा मित्र तो परस्पराचाहि शत्रु किंवा मित्र होय. दिवसानुदिवस परस्पर दोस्ती वाढविली जाईल अशी मला फार उमेद आहे. आपण या पत्राचे उत्तर लवकर पाठवाल अशी आशा आहे त्यायोगे आपली दोस्तीची मर्जी कशी आहे ते मला समजेल कळावे. बहुत काय लिहिणे ?

मुंबई, १८ आक्टोबर, १७८४. आर्. एच्. बॉडॅम्

एइ. सी...

पत्रांक ५० ॥ श्री ॥ (?)

शके १७०६ कार्तिक व॥ १०

७।११।१७८४ इ. नतर

मेहरबान **रावसाहेब** (?) यास—विशेष—दोन स्नेहपत्रे पोहोंचून मला फार आनद झाला. त्यात इकडील पत्रें उशीरा पोहोचल्याबद्दल लिहिलें होते. **कपनी** सरकार व आपण यान्या दरम्यानची दोस्ती व एकी गव्हर्नर जनरल **हेस्टिंग्** बहादर इमादुद्दवला यान्या मध्यस्थीने कायम राखण्याकरिता जडजवाहिरासह पोषाख पाठविला तो पावून फार समाधान झाले दीगर हकीकत—**जनार्दन शिवराम** हे माहे जमादिवल सन ११९८ हिजरीमध्यें येथे आलेले असून मला त्याबद्दल त्यांनी काहीच खबर दिलेली नाही परतु त्यानी आपले पत्र तारीख २३ मोहरम सन ११९९ चे मजकडे पोहोचविले तर मग त्यापूर्वी मी आपल्या पत्राचें उत्तर कसा देऊ शकेन बरें ? लाचार आहे त्यानतर मी मशारनिलेस बोलावून आणून पत्रे न देण्याचे कारण काय म्हणून चौकशी केली मशारनिलेनी पोकळ सबबी सागितल्या त्यानतर त्यास सागितले की, "पेशव्याकडून तुम्ही पोषाख वगैरे जे आणिलें आहे तें, दुसरा कोणता तरि एक दिवस कायम करून त्या दिवशी घेऊन यावे म्हणजे नेहमीच्या वहिवाटीप्रमाणे त्याचा स्वीकार केला जाइल" परतु मशारनिलेनी दिवस सुद्धा कायम ठरावला नाही व तसे न ठरविण्याचे कारणहि सागितलें नाही. **कपनी** सरकार व आपण यामधील दोस्ती जग कायम आहे तोपावेतो कायम रहावी अशी आमची मनापासून वासना असल्यामुळें सदर **जनार्दन राम** यांनी केलेली कसूर पाहून मनास दुःख झालें शिवाय आपली पत्रें पोहोचल्यानतर तीन दिवसानी मेहरबान **माधवराव सदा शिव** याजकडून आलेलें पत्र दिले त्याचेहि उत्तर लिहून पाठविले. तजावरच्या राजाच्या पत्राच्या मनाईबद्दल जें आपण लिहिले होते ते समजले. या बाबतीत तेथील आमच्या इलाख्यान्या माणसांस कोणीहि त्यासबधी मनाई न करण्याबद्दल व आपल्या माणसास अथवा पत्रास कोणत्याहि प्रकारें हरकत न करण्या बद्दल ताकीद दिली आहे, पुढें हरकत होणार नाही नेहेमी पत्रें पाठवून आनदवीत जावे हे विनति—

---

पत्रांक ५१ ॥ श्री ॥ **सयद नुरुद्दीन हुसेन**

शके १७०६ मार्गशीर्ष शु० ९ पा॥ २१।११।१७८४ इ.

**कारभारी नानासाहेब** यांस—सलामत. विशेष आपल्या आज्ञेप्रों माझ्या अल्पसमजुतीस वाटलें तें सरकारच्या खलित्यासह जनरलसाहेबांच्या सेवेसी लिहून पाठविलेलें आहे. ( उपदेशाचे ) शब्द ऐकणे हें खऱ्या दौलतीचें मूळ आहे

ज्याच्यावर वैभवरूपा ईश्वरानें केलेली आहे त्या हरएक जातीस हा उपदेश मान्य आहे. माझ्या पत्रातील 'अहदनाम्यातील शब्दच्छलाच्या फेरफारामुळे मला मदारुलू महामच्या पुढे जबाब देता येत नाही' हा मजकूर तुम्ही लिहिला आहे असे आपले म्हणणे आहे तर त्याकरिता बंगालचे साहेबास मुद्दाम या बाबतीत त्या करारनाम्यातील शब्दाच्या अर्थाबद्दल लिहिले आहे या मोठ्या कामात आपण बाप पणे जरूर आहे. सरकार श्रीमंत तिकडील उत्तर येईपर्यंत त्याजकडे काही लिहिणार नाहीत अशी आशा आहे सरकारकडून आपलेकडे उटसाडणीस्वार पाठविण्याबद्दल पत्र पाठविले होते त्याच्या उत्तरा, आपण दोन्ही सरकार एकच आहेत व उटसाडणीस्वार व सरकार कंपनीचा शिपाई व खलित्याचें उत्तर यासह पाठविले आहे म्हणून लिहिले. पत्रें नेणारास मी विचारले की, " अद्याप उटस्वारहि नाहीत व सरकारच्या खलित्याचा जबाबहि नाही. जनरलचेहि पत्र "पूर्वीच पाठविली आहेत हे काय आहे । व पत्रे कोणाबरोबर आहेत ?" असे आलें आहे .

---

**पत्रांक ५२** ॥ श्री ॥ **बॉंबेम्**

शके १७०६ पौष शु० १३ ता २४।१२।१७८४ इ

**श्रीमंत सवाई माधवराव नारायण पेशवासाहेब** यासी—

वि०– मौजे देगाव, परगणे सुपा, सरकार बंदर सुरत हा गाव **खोजा हजरत दीवानीसाहेब** ( सत्पुरुष ) याच्या दर्ग्याच्या खर्चाकरिता **काजी अबुल् हसनसाहेबांस पातशाहा शहाजहान** याच्या फरमानावरून दिलेला होता त्या बाबतीत मी आपणास बंदर सुरत मुक्कामाहून पत्र लिहून पाठविलें होते **खोजा** मजकूर हे **काजी अबुल् हसन** याचे आजे होत याच तसेंच देणगीचा फरमान कबूल करून हरबाबतीतील माफीचा परवाना **बाळाजीराव पेशवासाहेब** यानीहि दिलेला होता. ईश्वररुपने तो गाव काही आबादान होता. परतु आपले गुमास्ते गैरवाजवी कुरापती काढून दरसाल तीनसे पन्नास रुपयाची मागणी सदर गावावर करितात ज्या वेळी सदर हकीकत **माधवराव पेशवासाहेबांस** कळविली तेव्हा त्यानीहि हल्लीचे मजकूर **अबुल् हसन** याचें नावें माफीचा परवाना दिला होता. जोंपावेतो माझा तेथे अमल होता तोंपावेतों मी परवान्याप्रमाणें तजवीज करीत होतों व मौजे मजकुरास त्रास देण्याची खटपट केली नाही परतु आपल्या अमलांत आपले गुमास्ते मौजे मजकूरचा वसूल पूर्णपणे करीत आहेत. सबब **काजीमजकूर** याचा फार नुकसान तोटा झाला आहे. **काजीमजकूर** हे फार सभ्य गृहस्थ आहेत व त्याच्या चागलपणाची मला चागली माहिती आहे आपणास भानगड माहीत नसेल अशी माझी खात्री आहे. म्हणून आपल्या शेवेसी विनंती

करीत आहे का, ज्याप्रमाणे **बाळाजीराव व माधवराव पेशवे** यांनी माफीचा परवाना दिला त्याचप्रमाणें आपणहि कृपेने द्यावा. त्यांतच वर्तमान भावी गुमास्त्यास सक्त ताकीद करावी. कारण, सदर गावास येथून पुढ कोणतेहि प्रकारें उपसर्ग लागू नये. मी याबद्दल आपला फार आभारी होईन. वास्तविक पहाता, असे आपण केले असता आपल्या भलाईस व न्यायीपणास ते कारणीभूत होईल. बहुत काय लिहिणे ?

आर्. एच्. बॉडॅम्.

**सवाई माधवराव पेशवा** यास
**मुंबई** २४ डिसे. १७८४

---

**पत्रांक ५३** **॥ श्री ॥** **मॅकफर्सन्**

शके १७०६ फाल्गुन शु॥ १

रा॥ १०।२।१७८५ इ

**रावसाहेब माधवराव नारायण पेशवा सवाई पंडत प्रधान बहादर** यास, विशेष—ता ८ माहे फेब्रुवारी सन १७८५ इग्रजी मुताबिक ता० २७ माहे रबिलावल सन ११९९ हिजरी. मिस्तर **हेस्टिन् साहेब** बहादर गव्हनर जनरल यानी **ब्रिटन** नावाच्या जहाजावरून निघताना नौकरीवर असताना येथे असलेली आपली राहण्याची जागा व बगालच्या गव्हर्नर जनरलचा अधिकार या दोहोचा राजानामा लिहून पाठविला बगालचा गव्हर्नर जनरल मरेल अथवा राजीनामा देईल अथवा त्याची बदली होईल तर त्याच्या जागी कौसलातील त्याच्या दुसऱ्या दर्जाचा माणूस जो असेल त्यास नेमावे म्हणून **ग्रेट ब्रिटनचे बादशहा** याच्या कारकीर्दीच्या १३ व्या वर्षी एक व २१ व्या वर्षी दुसरा अशा निघालेल्या कायद्यात आहे मिस्तर **हेस्टीन** यानी राजीनामा देताना मीच दुसऱ्या दर्जाचा आहे परस्परातील पक्की मैत्री मनात आणून मी खबर देत आहे. वर लिहिलेल्या तारखेपासून मी बगालचा गव्हर्नर जनरल झालो व शपथहि घेतली मिस्तर **हेस्टीन** बहादर याच्या अधिकारावर आलो मला आपण मिस्टर **हेस्टिन** च्या जागी मानून वरचेवर पत्रे पाठवून आनदवीत जाल अशी आशा आहे बहुत काय लिहिणें ?

जॉन मॅकफर्सन्

---

**पत्रांक ५४** ॥ श्री ॥ ( १ )

शके १७०७ वैशाख शु० १०

पा १८।५।१७८५ इ.

मे० **हरि पंडत फडके** यांस—विशेष—आपला आयुष्यक्रम उत्तम प्रकारें वाखाणलेला आहे. लहान मोठ्याच्या अडचणी सारखेपणाने भागविणारे म्हणून आपण या जगात मशहूर आहात. आपण स्नेह्याचे आश्रयस्थान आहांत व **नानासाहे-बांच्या** ( नाना फडणवीसांच्या ) अत्यंत दोस्तपैकी एक समजले जात आहांत. अंतःकरणांतील गुह्य गोष्टीसंबंधीं आपल्या व आमच्या घराण्यांत मनांत निःसंशय पणे परका भाव नाही वाडवडीलहि असेंच समजत आले आहेत. सुमारें चार महिने झाले, मी आपल्या तिकडील हकीकतीचे उत्तराची मार्गप्रतीक्षा करीत आहे. प्रथम दिवसाप्रमाणेच जबाब येण्यात आजपर्यंतो स्थिति आहे एक नवीनच वार्ता—पूर्वीचें रंगरूप पालटलेल्या एखाद्या नवीन निर्माण झालेल्या फुलाच्या कळी-प्रमाणें-ऐकून अत्यंतच आनंद झाला. ती ही की, पूर्वी लिहिल्याप्रमाणे **भिकाजीपंत सुभेदार** यांस तांबडतोब पाठविण्याचे ठरले होते परंतु त्यास विशेषच विलंब झाला ही एक अत्यंत समाधानाची गोष्ट झाली. या गोष्टीस जगातील सर्व शहाणे लोक पसंत करितात. जगातील अत्यंत उत्तम गोष्टी पैकीच ही एक घडलेली आहे. या गोष्टीस नाक मुरडण्याची कोणाची छाती आहे ? कारण तोच भला माणूस की, ज्याने भलाईरूपी चेंडु आपल्याबरोबर जगातून नेला. आपण आपल्या व **नानासाहे-बांच्या** बुद्धिचातुर्याने व शहाणपणाने इकडे येणाऱ्या माणसास समजाऊन सांगि-तलें व मृत्युपत्र व इतर लेख हे सर्व आपण एका बाजूस टाकून आमच्यावर कृपा केली. जगातील चांगलें वाईट कृत्य ईश्वराचे हातात आहे. त्याच्या हुकमापुढें सेवकाची इच्छा काय कामाची ? आपण हरप्रकारे बुद्धिमान् शहाणे आहांत व शरणागतास अभीष्ट देणारे आहांत. अशा या कृत्यात फायदा, लक्ष्मी व लोकाचा आराम आहे व मृताच्या आत्म्यास शांतिप्रद होईल. त्यांत परिश्रम करीत असावे व दुनियेतील लोकास आराम द्यावा. मयताच्या पश्चात् त्यानें केलेल्या सत्कृत्यामुळेच त्याचें नाव जिवंत राहतें. हे पत्र लिहिणारा ( मी ) साफ अंतःकरणाचा असल्यामुळें असें लिहीत आहे. आमच्या मालकाच्या हुकुमा-प्रमाणें राहावें, मात्र सरदारी करण्याचा हेतु नाही. जर आमच्या मालकाच्या घरा-ण्याशी स्नेहसंबंध असेल तर पूर्वी लिहिल्याप्रमाणें मशारनिले ( **नानासाहेब** ) यांस पाठविण्यासंबधी आता व पुढें लिहूं त्याप्रमाणे तजवीज करावी पुण्याच्या मेहरबान मंडळीस माझी आठवण देण्याची कृपा करावी. जास्त काय अतिशयोक्ति करूं ? आरोग्य व स्नेह दृढ असो.

---

**पत्रांक ५५** ॥ श्री ॥ **बॉडॅम्**

शके १७०७ आषाढ शु० ७ रा॥ १३।७।१७८५ इ

मे० **नाना फडणवीस** यास.—

विनति विशेष. एक स्नेहपूर्ण पत्र, घोडी व हरीण **रणछोड शेणवी** याबरोबर आपण पाठविले होतें तें सुखमयीं प्रविष्ट झाले, व तें पाहून मला फार आनंद झाला परंतु घोडी आणि हरीण परत करण्याबाबत मला फार दुःख होत आहे. कारण काही **हरीण** वाटेंत व काही येथे मरण पावले 'कोणत्याहि सबबीवर कोणीहि मनुष्यानें नजराणा घेऊं नये' असा बादशाही व कंपनीचा हुकुम त्याच्या लहान थोर नोकर अमलदारास कडकरीतीने सुटलेला आहे त्याच्यावर लक्ष्य देणें वश्य आहे. हुजुरच्या हुकमाचा खुलासा आमचे वकील **नुरुद्दीन हुसेनखान** व **रणछोड शेणवी** हे आपले सेवेसी जाहीर करतील ही नजराण्याची चाल नाहींशी करण्यानें परस्पराच्या मैत्रींत यत्किंचित अंतर येईल असे आपण समजणार नाहीत अशी खात्री आहे. महाराज ! जेथें अकृत्रिम व पक्का स्नेह समोर आहे तेथें नजराण्याच्या देवघेवीनें तो वाढवू पहाणे याचा अर्थ काय ? माझ्याकडून परस्पर दोस्तीत केसभर देखील कसूर होणार नाही **रणछोड शेणवी** बंदरी आल्यानंतर आजारी पडले, एक वेळ माझ्या भेटीस येऊन त्यानी आपल्या हुकुमाप्रमाणे सर्व हकीकत जाहीर केली त्याचें उत्तर लौकरच पाठविण्यात येइल विशेष काय लिहिणे ?

आर् एच् बॉडॅम्

**नाना फडणवीस** यास
**मुंबई**, ता १३ जुलै १७८५

---

**पत्रांक ५६** ॥ श्री ॥ **बॉडॅम्**

शके १७०७ आषाढ शु० १० रा॥ ता १७ जुलै १७८५ इ

मे० **बाळाजी पंडत नानाफडणवीस** याचे सेवेसी— विशेष— आपले ता २४ माहे रजब रोजी लिहिलेलें स्नेहपत्र उत्तम वेळी पोहोंचलें. बरेच दिवस झाले, मिस्तर **मॅलेटसाहेबाचे** पत्र मला आलें नाही त्यामुळे ते पुण्यास केव्हां येतील हें मला समजत नाही आपल्या दरबारात येण्याकरिता अमुक ठिकाणी वाट चालत आहेत हे मला समजताच त्याबद्दल मी आपणास खबर देईन. आपल्या आज्ञेप्रमाणे कित्येक मजकूर **रणछोड शेणवी** यानी ( आम्हास ) जाहीर केले त्याचें उत्तर त्यास दिलेले आहे मशारनिले आपल्या सेवेसी वाचनाकरिता निःशंकपणें पाठवितील अशी मला आशा आहे. दोन सरकारामध्यें असलेला स्नेह व भलाई वाढविण्याचा माझा शक्य तितका पूर्ण हेतु आहे विशेष काय लिहिणे ?

**नाना फडणवीस** यास. आर्. एच्. बॉडॅम्.
**मुंबई**, १७ जुलै १७८५.

---

पत्रांक ५७ ॥ श्री ॥ बॉडॅम्

शके १७०७ श्रावण शु १३ ता १८।८।१७८५ इ

**श्रीमंत माधवराव नारायण पंत प्रधान** याचे सेवेसी विशेष—**सयद् नुरुद्दिन हुसेन खान** व **रणछोड शेणवी** यानी आम्हांस कळविलें की, आपणास या पक्ष्याची फार आवड आहे. त्यावरून हल्ली एक पिंजरा तयार करून आपल्या माणसाबरोबर पाठविला आहे आपण त्याचा पसतीनें स्वीकार कराल अशी उमेद् आहे व त्यामुळ आम्हासहि आनद् होणार आहे बहुत काय लिहिणे ?

**पेशवे यांस** **आर् एच् बॉडॅम्**

**मुंबई** १८ आगष्ट १७८५

---

पत्रांक ५८ ॥ श्री ॥ थॉमस् डे.

शके १७०७ श्रावण व० ७ ता २६।८।१७८५ इ.

मे० **माधवराव पंडत प्रधानसाहेब** यास—विशेष—आपलें कृपापत्र पावलें, त्यातील मजकूर समजला चौथाईसबधी तूप व काठा (?) हे हक्काबद्दल म्हणून देण्यात **नवाबसाहेब बंदगान आली** याचे अधिकारी दिक्कत करतात म्हणून आपण लिहिलें या बाब तीत आपल्या चौथाईबद्दल आमचेकडे पूर्वी काहीच माहीत झालेले नाही **नबाबसाहेबांचे** अधिकारी ती बाब आपणास देण्यास हरकत करतात म्हणून आताच माहीत झाले. आता जर त्यात काही कसूर होईल व आपल्या माणसानी आम्हास कळविलें तर जरूर ताकीद् केली जाईल कारण परस्पर सरकारात भेद् नाही नेहमी कृपापत्र पाठवून आभारी करावे बहुत तसदी काय देऊ ? आपली लक्ष्मी व वैभव दिवसानुदिवस वाढो. लिहिलें तारीख २६ माहे आगष्ट १७८५ अग्रेजी मुताबिक छ १८ शवाल सन ११९९ हिजरी

**थॉमस् डे.**

---

पत्रांक ५९ ॥ श्री ॥ बॉडॅम्

शके १७०७ आश्विन व० ७ ता २४।१०।१७८५ इ.

**श्रीमंत माधवराव नारायणराव पंडित प्रधान** याचे सेवेसी—विशेष—आपलें कृपापत्र उत्तम वेळी पोहोचलें बंदर सुरत येथील **नबाब** हे पूर्वीच्या वहिवाटीविरुद्ध वागतात म्हणून तक्रार आपण केली ती समजली. **पेशवेसरकारांची** चौथ चालू करण्यात कोणत्याहि तऱ्हेनें हरकत करू नये व चौथसंबधी वगैरे कारभार पूर्वीप्रमाणेंच चालविणे म्हणून सुरत बंदरच्या **नबाबांस** पत्र पाठविले आहे हें आपणास जाहीर व्हावे तुमचा ज्यात सबब आहे तेवढ्या

प्रांतांतच कारभार करावा. त्याशिवाय इतर प्रांतात काही करू नये. पूर्वीप्रमाणेच चौथेची वहिवाट कायम ठेवून आपल्या प्रांतात नवीन वहिवाट पाडण्याचें धाडस करू नये म्हणून मजकुराचें पत्र आपण सदर **नबाब**साहेबाच्या नावें पाठवावें म्हणून विनंती करीत आहे. मीहि याप्रमाणें सदर **नबाब**साहेबांस लिहिलेलें आहे. ईश्वर इच्छेने त्याचें उत्तर लवकरच येईल. परस्परांतील तक्रार लवकर नाहीशी होईल बहुत काय लिहिणें ?

२४ आक्टोबर १७८५. **आर्. एच्. बॉर्डम्**

( सही )

---

**पत्रांक ६०** ॥ श्री ॥ **मॅकफर्सन्**

शके १७०७ कार्तिक व० ४ रा। ३०।११।१७८५ इ.

मित्राचा अतिशय थोर व उच्च आधारस्तंभ **बाळाजी पंडित** यास ईश्वर सुरक्षित राखो. विशेष गव्हर्नर **मिस्तर हेस्टिन्** याच्या जागी बंगालच्या गव्हर्नरजनरलच्या अधिकारावर माझी नेमणूक झाल्याचें आपणास समजल्याबद्दल आपलें प्रेमपुरःसर आनंददायक कृपापत्र व मैत्रीखातर देणगी वगैरे पाठविली ती पोहोचून अंतःकरणास दुप्पट खुषी झाली. वास्तविक पहाता आपण **कंपनीचे** व माझे असे दोघांचेहि अंतःकरणापासून स्नेही आहात. इतरापेक्षा आपणास वरील गोष्टीमुळे जास्त आनंद वाटला असेल अशी मला खात्री वाटते. तो ईश्वर सर्व प्रकारें आपणास नेहमी सुखी ठेवो व आपल्या स्नेहरूपी घराची भरभराट करो. आपण मला सर्व प्रकारे मैत्रीत मुरलेला व आपल्या व **कंपनी** सरकारच्या दरम्यानच्या दोस्तीची एक मजबूत साखळी असें समजून याचप्रमाणे वरचेवर कृपापत्र पाठवून संतोषवीत असले पाहिजें.

**जॉन् मॅकफर्सन्**

३० नवंबर ८५

---

**पत्रांक ६१** ॥ श्री ॥ **बॉर्डम्**

शके १७०७ मार्ग० व० २ रा। २१।१२।१७८५ इ.

**श्रीमंत सवाई माधवराव नारायण पंत प्रधान** यांचे सेवेसी—

विशेष. सुमारें दोन वर्षें झाली असतील आपण ता. १० माहे जानेवारी सन १७८४ इसवी रोजीं लिहिलेले कृपापत्र पोहोचले. त्यातील मजकूर-मयत **दादासाहेब** म्हणजे **रघुनाथराव** यानी आपल्या हयातीत सहा लाख व पंचवीस हजार रुपये किंमतीचें जवाहीर सरकारांत ( **इंग्रजाकडे** ) अमानत म्हणून ठेविलेलें आहे. व या बाबतीत आमचे चुलते **बाजीराव** यानीहि आपणास "सदरहु जवाहीर आमच्या-

कडे पाठवावे" या मजकुराचें पत्र **महादाजी रामचंद्र** यांच्या बरोबर पाठविलेलें आहे. त्याच पत्रांत "सदर जवाहीर मशारनिले **महादाजी** याबरोबर पाठवावें" असेंहि लिहलेलें होतें. तेंहि पत्र मला मिळाले त्याच्या उत्तरी 'मयत **रघुनाथराव** यांनी सदर जवाहीर कर्जाऊ गहाण म्हणून **कंपनी** अंग्रेज बहादर यांजजवळ ठेविलें होतें. कर्जाऊ रुपये परत मिळाल्यावर सदर जवाहीर परत देण्यात येईल" असें लिहिलेले होतें. महाराज, मी अद्याप या बाबतीत आपलेकडून पत्रोत्तर येईल म्हणून वाट पहात स्वस्थ आहे परंतु मी आपल्या ठिकाणी ( मनात ) असें ठरविलें आहे की, सदरहु जवाहीर विकून टाकावें. तरी या स्नेहपत्रानें हा मजकूर आपणास कळवून तसदी देत आहे. ती अशी की, गहाण जवाहीर सोडविण्याची आपली मर्जी असेल तर सहा लाख रुपये रोकड रकम पाठवावी. मी सदर जवाहीर परत करण्यास तयार आहे. नसल्यास नाही. खरेदीदाराच्या हस्ते सदर जवाहीर चागले किमतीस विकलें जाईल. सरकार **कंपनी** व आपण यामध्ये असलेल्या स्नेहावर नजर देऊन या बाबतींत आपणास खबर देणे हें माझे कर्तव्य आहे. स्नेहवृद्धी-शिवाय जास्त काय लिहावे ! नहेमी सुखाचा काल असो

**माधवराव नारायण पेशवा यांस,** **आर्. एच्. बॉडॅम्.**
**मुंबई,** २१ डिसेंबर १७८५.

---

**पत्रांक ६२** **॥ श्री ॥** **बॉडॅम्**
शके १७०७ मार्ग० व० १० रा २६।१२।१७८५ इ.

**श्रीमंत माधवराव नारायणराव पंडत प्रधान** याचे सेवेसी, विशेष— आपणास जाहीर करण्यांत येत आहे की, पावसाळ्यामुळें ( अथवा ओढ्यामुळें ) डभोई खाली करतांना आमच्या **कंपनी** सरकाराच्या माणसानी तेथे टाकलेली लढाऊ शस्त्रें परत आमच्या ताब्यात देण्याकरिता आपण हुकुम तेथील पंडिताच्या नावे दिला होता परंतु सदर पंडिताने अद्याप आमच्या लोकांच्या ताब्यात ती दिली नाहीत. शिवाय, सनद माझ्या नावें नाही. करिता आपल्या सेवेसी विनति केली जात आहे की, बंदर सुरत येथील सरदारापैकी काही माणसें व भडोच येथील **कंपनी** सरकारचे कोटीदार देहि तेथे जातील त्याच्या हवाली सदर शस्त्रें करण्याबद्दल पंडित मजकूर याचे नांवें ताजी सनद रुपेनें पाठवावी. बहुत काय लिहिणें !

**माधवराव नारायण पेशवा, यांस** **आर्. एच् बॉडॅम्**
**मुंबई,** २६ डिसेंबर १७८५ इ.

---

**पत्रांक ६३** **॥ श्री ॥** **बॉडॅम्**
शके १७०७ माघ शु० १२ रा १० फेब्रुवारी १७८६ इ.

**श्रीमंत माधवराव नारायण पंडित प्रधान** याचे सेवेसी— विशेष—

परस्पर स्नेह व दोस्तीवर नजर देऊन मिस्तर **चार्लस वार् मालेटसाहेब** यास इयजातर्फे पूर्ण अखत्यार देऊन आपल्या दरबारी रहाण्याकरिता म्हणून पाठविले आहेत मिस्तर मजकूर यास आपण परस्पर सरकारांचा विश्वासूक हितचिंतक समजाल अशी उमेद आहे. सदर मिस्तर यास आपण रहस्यान घेऊन प्रेमानें त्यांशी वागून त्यास मान द्याल एवढी तसदी मी आपणास या स्नेहपत्रद्वारे देत आहे मी असें ऐकिले आहे की, आपणास परदेशी हरएक पदार्थाचा फार शोक आहे म्हणून मिस्तर मजकूर याजबरोबर माझ्याकरिता आफ्रिकेमधून नुकताच आलेला सुदर व लहान शहामृग पक्षी आपणांकडे पाठविला आहे. आपण कृपेनें तो स्वीकाराल अशी आशा आहे. बहुत काय लिहिणें ?

**माधवराव नारायण पेशवे, यांस** **आर् एच् बॉर्डम्**
**मुंबई** १० फेब्रुवारी. १७८६

---

**पत्रांक ६४** **॥ श्री ॥** **बॉडम्**

शके १७०७ माघ शु० १४ रा। १२।२।१७८६ इ

**श्रीमंत पेशवासाहेब माधवराव नारायण पंत प्रधान** याचे सेवेसी—

विशेष– मी पाठविलेल्या पत्राच्या उत्तरी तीन स्नेहपत्रे सोबतच्या दोन पत्रासह पोहोचली त्यापैकी एक **कादरी** जहाजाच्या खुलाशाबद्दल कंपनीचे अमलदाराच्या नांवे **जिवाजी गोपाळ सरसुभेदार** यानकडून व दुसरे पत्र आपणाकडुन मुंबईच्या अमलदाराच्या नावें 'डभईशहर सोडताना तेथे कंपनी अग्रेज बहादर यानी ठेविलेले लढाईचें सामानसुमान वगैर **नुरुद्दिन हुसेन खान** याजबरोबर पाठविण्याची आज्ञा त्याप्रमाणे वेळीच पोहोचले' या मजकुराचे होते तुम्हास विलायतेहून 'मयत **रघुनाथराव** यानी गहाण कर्जाऊ ठेविलेले जवाहिर गहाणाची रोकड रकम न घेता परत त्यास द्यावे' अशा मजकुराचा हुकुम आम्हास पोहोचल्याबद्दल मजकूर आपल्या पत्रात आहे तर त्याबद्दल उत्तरी कळवितों की, विलायतेहून असा हुकुम आलेला नाही तथापि आपली मर्जी असेल तर सदर गहाण जवाहिराबद्दल रोकड सहा लाख व पंचवीस हजार रुपये द्याल तर परत करण्यात येईल नाही तर नाही. सदर जवाहिर वाटेल त्या किमतीस विकण्यात यईल. तरी कृपेनें या बाबतीत अखेर जबाब देऊन खुषी करावी. **नुरुद्दिन हुसेनखान सर चार्लस वार मॅलेटसाहेबा**बरोबर पुण्यास रवाना झाले आहेत जरूर गोष्टीबद्दल तपसीलवार मिस्तरमजकूर आपणास जाहीर करतील . . . विशेष. बहुत काय लिहावे . . . .

**पेशवे यांस,** **आर्. एच्. बॉडम्**
**मुंबई,** १२ फेब्रुवारी १७८६.

---

**पत्रांक ६५** || श्री || **सर चार्लस् वार मॅलेट्**

शके १७०७ फाल्गुन शु. १३ पो १२।३।१७८६ इ.

मे० **बाळाजी जनार्दन मदारुल्महाम्** यास—सलाम, विशेष. माझ्या पत्राच्या उत्तरीं आपलें कृपापत्र पावलें माझ्याकडील खबर समजून झालेला आनंद व परस्पर सरकाराच्या दोस्ती याबद्दल मजकुराचें तें होतें त्यामुळें मला अत्यंत खुषी वाटली कारण त्यांत परस्पर भेटीची उत्कंठा अमर्याद दर्शविलेली होती विजयी फौजेस मिळण्याकरितां मी मुंबईहून तावडतोब रवाना झालों ईश्वरेच्छेनें लवकरच आपल्या सेवेसी येईन. सध्या **पटेलसाहेब** ( **शिंदे** ) याजकडून एक आपल्या नांवें व दुसरें **श्रीमंतसाहेबांच्या** नावें अशी दोन पत्रें माझ्याकडे आली ती आपल्या सेवेसी पाठविली आहेत. ती आपण वाचालच वरकड मजकूर **बहिरोपंतजीच्या** जबानीवरून समजेल विशेष—वैभववृद्धि यथेच्छित होवो.

---

**पत्रांक ६६** || श्री || **मॅकफर्सन्.**

शके १७०७ फाल्गुन व० ३ पा० १८।३।१७८६ इ

( रा १३।१२।१७८५. )

मे० **रावसाहेब** (१) यास— विशेष— बंगालच्या गव्हर्नर जनरलीच्या जागेवर **मिस्टर हेस्टिन् ( हेस्टिंग्ज् ) बहादर** याच्या ठिकाणी मला नेमल्याबद्दल आपलें अभिनंदनपर पत्र आलें व सोबत एक पोषाख परस्परांतील मित्र दोस्तीवर नजर देऊन पाठविला तो पोहोंचून मला फार आभारपूर्वक आनंद झाला. कारण मी आपला एक अकृत्रिम खरा स्नेही व आपल्या राज्याच्या कारभाराची भरभराट व्हावी असें मनापासून इच्छिणारा, आणि आपण व सरकार **कंपनी** यामधील स्नेहाची अभिवृद्धि करण्यांत तत्पर आहे सन १७८१ इ मध्ये हिंदुस्थानांत आल्यापासून आपण व **कंपनी**सरकार यामधील दोस्ती पक्की करून तटेबखेडे नाहीसे करून परस्पराचें नांव व मोठेपणा वाढावण्यामध्यें मी किती खटपटी व नजविजी केल्या तें सर्व आपल्या ( सरकारच्या ) कारभाऱ्यासहि माहीत आहे त्या वेळेपासून आतापावेतो आपण व **अंग्रेज**बहादराचे साहेबलोक यामधील दोस्ती वृद्धिंगतच होत आहे व जोपावेतों मी या गव्हर्नर जनरलच्या अधिकारावर आहे तोंपर्यंत दोस्तीची कामें पार पाडण्यांत केसभरहि तफावत होणार नाहीं, व आपल्या राज्यासंबंधीच्या बाबतीनहि मी दोस्तीत फरक करणार नाहीं आपला स्नेही माझ्याइतका आहे तितका सर्व हिंदुस्थानांत इतर कोणीहि इंग्रजांत आहे असें मला आढळत नाहीं कारण, **इंग्रज** साहेबलोक आपल्या ताब्यांतील मुलखापेक्षां फाजील मुलखाची अपेक्षा करीत नाहींत व गैरवाजवी फायदाहि इच्छित नाहींत तरी आपणास लढाईच्या किंवा शांततेच्या प्रसंगीं **इंग्रज** लोकांच्या स्नेहाचा जितका **फायदा होईल**

तितका दुसऱ्या कोणाचाहि होणार नाही. मी **माधवराव शिंदे** याजबराबर हमेशा पत्रव्यवहार करीत आहे कारण, **रावसाहेब ( शिंदे )** हि मला अकृत्रिम स्नेही असे मनापासून समजतात सदर **रावसाहेब** हे माझ्या मनांतील सर्व गुप्त गोष्टी जाणतात. सदर **रावसाहेब** हे आपलें मीठ खाणारे ( विश्वासूक व कृतज्ञ ) असल्यामुळे त्यांनी आपणास माझ्या व त्याच्या अंतःस्थ स्नेहासंबधी मजकूर कळविला असेलच. हल्ली माझ्या मनांत असे आहे की, **कंपनी**सरकारासंबधी बोलणे-चालणें करण्याकरिता आपणापाशी व कारभाऱ्यापाशी आमच्यातर्फे एक माणूस अधिकृत वकील म्हणून हजर असावा सबब, कंपनीबहादुराच्या नोकरांपैकी एक निवडक माणूस **मिस्टर मॅलेटसाहेब** यांस आपल्या सेवेसी हजर राहण्याकरितां कायम केले आहे. आपणासहि जर याप्रमाणें त्यांनी आपल्या दरबारी रहाणें मंजूर असेल तर आपण साहेबमजकूर यास खुलासेवार लिहावें की, 'हें पत्र पावतांच आमच्या सेवेसी हजर व्हावें'– पूर्वी ज्या वेळी आपणा परस्परांतील करारमदार कायम झाला त्या वेळी **माधवराव शिंदे** मुखत्यार होते, म्हणून पूर्वीपासूनच मी **मिस्टर मॅलेटसाहेबांच्या** बाबतीत त्यास ( **शिंदे** यास ) लिहिलेलें होतें. त्याचप्रमाणें **मिस्टर मॅलेटसाहेबांस**हि **शिंद्याकडे** जाऊन स्नेह करावा म्हणून लिहिलेले आहे. **शिंदेसाहेबांनी**हि आपणांस याबद्दल लिहिलें असेलच. व मिस्टर मोस्र्फहि आपल्या सेवेसी हजर होऊन तपशीलवार मजकूर जाहीर करतील. इकडे आसपास मिळणाऱ्या वस्तूचा नजराणा साहेबमजकूर याजबरोबर आपणाकरिता पाठविलेला आहे तो जरी आपणास साजेसा नाही तरी आपण त्याचा स्वीकार करून मला आभारी कराल अशी आशा आहे. वरचेवर कुशलपत्रें पाठवून आनंदवीत जाल अशी आशा आहे. बहुत काय लिहिणें ?

**जॉन मॅकफर्सन्**

---

**पत्रांक ६७** ॥ श्री ॥ **सर चार्लस् मॅलेट्**

शके १७०७ फाल्गुन व० ८ पो २३।३।१७८६ इ.

मे० **बाळाजी जनार्दन साहेब** यास–सलाम विशेष–हल्ली कलकत्त्याहून एक **श्रीमंतां**च्या नावें व दुसरें आपल्या नावें व सोबत एक माझ्या नावें अशी पत्रे आली. त्यांत तुफानामुळें गियानि बंदरांत गेलेले तेथील माणसांनीं करारमदाराविरुद्ध ताब्यांत ठेविलेलें इंग्रजी जहाज **श्रीमंत**साहेबांकडून कराराप्रमाणें परत देण्यासंबंधी सनद घेणेबद्दल मजकूर आहे. **श्रीमंतां**च्या नावचें पत्र त्याजकडे पाठविले आहे. व आपलें पत्र ईश्वरकृपेनें लवकरच पोहोंचवितो. बाहेरून खबर ऐकूं येतें की, मुंबईहून रवाना झालेली चार जहाजे सरकार **पंडित प्रधानसाहेबांच्या** माणसांनी बंदर गियांनमध्यें नेली आहेत. तरी हा खटला मनास आणून वचन प्रमाणास अनुसरून

सदर जहाज सोडण्याबद्दल लिहून ताकीदीसह व पत्रोत्तरासह गव्हर्नर जनरल साहेब जनरल बंगाला याचे नावे पत्र मजकडे लवकर पाठवाल अशी आशा आहे. यानंतर पुण्यास दाखल होण्यावेळी गव्हर्नर जनरलचे एक पत्र व नंतर मुंबई गव्हर्नरची दोन पत्रे व त्यानंतर गव्हर्नर जनरलची दोन पत्रे अशी आपलेकडे रवाना केली आहेतच त्यापैकी एकाचेंहि उत्तर आपले कडून आलें नाही ( कदाचित् ) रस्त्यांत असेल. याबाबतीत जलदी करणें चांगलें. विशेष

---

**पत्रांक ६८** ॥ श्री ॥ **सयद नुरुद्दीन हुसेन**

शके १७०७ फाल्गुन नंतर. मार्च १७८६ इ. नंतर

रावसाहेब मुषफक मेहरबान चिरंजीव **नारायणराव मुनशी** यास–सलामव्—किमयाप्रमाणे परिणामकारक अशा आपल्या भेटीची इच्छा आहे. आपल्या पत्रावरून सर्व समजलें व आपणास कळावें की, **जनरल मिस्तर ब्राउन** एस्कायर यांनी मला श्रीमंत महाराजाच्या सेवेसी राहण्याकरिता मुंबईहून पुण्यास पाठविलें आहे. मी तेथें हजर असणें म्हणजे हे एक परस्परांतील वाढत्या एकीचें व दोस्तीचें चिन्हच होय येथे पोहोचल्यावर समजलें की, **नानासाहेब** व सर्व सरकारच्या फौजा आधीच रवाना झाले आहेत हल्ली साहेबांच्या मर्जीवर अवलंबून आहे आपल्या सेवेसी कळावे म्हणून लिहिले आहे आज पाषाण ( पाषाण ) मुक्कामी उतरलों आहे. काल रात्रीपासून प्रवासांतील श्रमामुळे मला थोडा थकवा आलेला आहे तरी एखादें आरामशीर घर राहण्याकरितां परवानगीने मिळेल अशी आशा आहे. **नानासाहेबांची** भेट घेण्याची व **श्रीमंत** महाराजाच्या सेवेची पद्धति याबद्दल व इतर योग्य गोष्टींबद्दल आपलें मत सल्ला स्पष्ट लिहून कळवीत जावा इतर प्रत्येक महत्वाची गोष्ट मी आपणास निवेदन करीन. सुदैवाने स्नेहाची भेट फार दिवसांनी होत आहे म्हणून फार आनंद होत आहे मला फार इच्छा होती. याउपर आपला अधिकार आहे **जनराल**साहेबांकडून **श्रीमंत**साहेबांसहि ( यासोबत ) एक खलीता आहे पहुंच बहुत होय पुरवणी—**नानासाहेबांस** मी जे पत्र लिहिलेलें आहे त्यात आपल्या जबानीचा मी हवाला दिला आहे माझा व्यक्तिविषयक सर्व मजकूर समजाविण्याची कृपा करणें अवश्य आहे.

---

**पत्रांक ६९** ॥ श्री ॥ **सयद नुरुद्दीन हुसेन**

शके १७०७ फाल्गुन नंतर मार्च १७८६ नंतर

**गोपाळराव**जू यास–विशेष–स्नेहपूर्वक आपणास कळवितो की, यापूर्वी **कारभारी**साहेबांचे कृपापत्र पोहोचले. त्यांतील मजकूर **जनराल**साहेब बहादूर

यास जाहीर केला त्याचें उत्तरी त्यानी लिहिलें आहे की, उन्हाळा कडक आहे व **नानासाहेब** सुद्धा लवकरच परत येतील तोपावेतो पुण्यात वाट पहावी. सबब या गोष्टींची खबर **अमृतरावजू** यास मी दिली. त्यानी कळविलें की, तुम्ही याच वेळी मुबईकडे कूच करावे. त्यावरून त्याचे हुकुमाप्रमाणें मी मुबईस कूच केलेलें आहे. या बाबतीतील खर्चाबद्दल मी **कारभारी**साहेबांस लिहिलेलें आहे. तरी त्याजकडे दाखल कराल अशी आशा आहे. जास्तीत जास्त तीन चार दिवसांत घाटापावेतो पोहोंचणें होईल.

---

**पत्रांक ७०** **॥ श्री ॥** **बॉर्डम्**

शके १७०८ वैशाख व० ८ रा॥ १४।५।१७८६ इ.

**श्रीमंत माधवराव नारायण पंत प्रधान पेशवा**साहेब यास—

विशेष— आपले तारीख २५ माहे जमादिलाखर रोजी लिहिलेले पत्र उत्तम समया पोहेंचून परम सतोष झाला व मी त्याचे उत्तर मिस्तर **मॅलेटसाहेब**बहादूर यास लिहिलेलें आहे. मिस्तर मजकूर हे आपल्या सेवेसी सर्व मजकूर जाहीर करतील. मिस्तरमजकूर हे पूर्ण विश्वासूक समजून उभयता सरकारातील हरएक भलाईच्या गोष्टीबद्दल काही किंतु न आणिता त्याशी वागावे. मिस्तरमजकूर माझ्या लिहिण्याप्रमाणें आपल्यास मजकूर निवेदन करतील तो आपण पूर्णपणे लक्ष्यात घ्यावा आपणहि ह्या गोष्टीबद्दल सर्व मजकूर तपशीलवार गव्हरनर जनरल मि **मेकफारसनसाहेब** बहादूर यास बगाल्यात लिहून कळवाल अशी आशा आहे त्यानतर गव्हर्नरमजकूर याजकडून जसा हुकुम होईल त्याप्रमाणे अमलात आणलें जाईल. प्रत्येक गोष्टात भलाईने लक्ष आपण घातल्यास विजय व यश प्राप्त होईल अशी मला खात्री आहे. आपण व **कंपनी**बहादूर यामधील स्नेहसबंध वरचेवर वृद्धिंगत झाल्याने परस्पर भुषणावह होईल ह्या कामी मी नेहमी तत्पर आहें असे समजावे विशेष काय लिहावें ?

**आर. एच्. बॉर्डम्**

**माधवराव नारायण पेशवा यांस.**

**मुंबई,** १४ मे १७८४

**विल्यम् थॉमस सँडिफोर्ड.**

---

**पत्रांक ७१** **॥ श्री ॥** **बॉर्डम्**

शके १७०८ आषाढ शु॥ ९ रा॥ ४।७।१७८६ इ.

**श्रीमंत माधवराव नारायण पंत प्रधान** यांचे सेवसीः—विशेष—

मी कळवितों की, मी आपल्या कृपेनें खुशरूप आहे. सुरत बदराच्या चौथबद्दल

आपण व **काशीनाथ हरी** व **नवाबसाहेब कायमुद्दौला** यांमध्यें तटा पडला होता. त्याचा निकाल सदर बद्राच सरदार मिस्तर **रामसे** यांच्या विचारें झाला मी आपणास व **नवाबसा**हेबासहि पूज्य मानतो व प्रत्येक सरकाराच्या भलाईची मला फार अपेक्षा आहे त्यामुळें मी मोठा खुष आहे. यामुळे मोठमोठी कामें शेवटास गेली. राजाराजामध्ये एकचित्तता कायम असणें ही गोष्ट त्यास अत्यत जरूर आहे. सदरबद्दल तपशीलवार हकीकत **काशीनाथ** याजकडे सोपविली आहे. माझ्या अधिकारात माझ्या हातून होण्यासारख्या कामाची आपण मला आज्ञा केल्यास ती मला खुषीस कारणीभूत होईल स्नेहरुपावृद्धि जास्त व्हावी यापेक्षा जास्त काय लिहू ? सौख्यकाल नेहेमी असो.

**महादूराव पेशवा यास,** **आर् . एच् . बॉडॅम्**

**मुंबई,** ४ जुलै १७८६

**वि. थॉ. सॅंडिफोर्ड.**

---

**पत्रांक ७२** **॥ श्री ॥** **ॲंड्रयूज् रॅमसे**

शके १७०८ आषाढ शु० १२ रा। ८ । ७ । १७८६ ई.

**श्रीमंत पंत प्रधान साहेब यांस**-विशेष-बलसार परगण्याचे गुमास्ते **आनंदराव भिकाजी** याच्या मार्फत आपले कृपापत्र उत्तम समयी प्रविष्ट झाले व त्यातील मजकूर समजला आपण लिहिलें होतें की, " परगणे बलसार व भूत सर्व-भवारी ( ? ) याजपासून तीन हजार रुपये सुरतेच्या **नबाबानीं** फाजील घेतलेले आहेत तरी त्यास विचारपूस करून सदरहु फाजील रकम परत देववावी. " आपल्या लिहिण्याप्रमाणे सदर **नबाब**साहेब याजशी बोलणे केलें **नबाब**साहेबानी हेंच उत्तर पाठविलें की, " परगणे बलसार हा **नबाबवजीर आसफजाह** याची जहागीर आहे व येथील अमलदार **शेखमहमद ताहर** नावाचा आहे. परगणे बलसारकडून दरसाल माडवी लवाजम्याशिवाय आठ हजार रुपये घेत असत त्यानंतर **हाफिज् मसुदखान** याने **नबाब सफदरखान** यास या जागेबद्दल विनती करून ती हस्तगत केला हेहि याच प्राचीन वहिवाटीप्रमाणें वसूल करीत आले व शिवाय, सदर **नबाबानीं** प्राचीन वहिवाटीसबधी फार खटपट केली परतु त्यात फरक झाला नाही. " याहिशिवाय **नबाबसाहेब** म्हणतात की, " परगणे मजकूराचे देसाई व रयत याजखातर एक हजार रुपये कमी करून सात हजार रुपये घेतले " सदरहु देसायाचा राजीनामा लिहिलेला सदर **नबाब**साहेबाजवळ आहे. बलसारच्या सर्व परगण्याशिवाय परगणे पारनेरामधील तेविसशें रुपये हे तर वेगळेच आहेत. सदरहु तीन हजार रुपये फाजील असलेले परत देण्याच्या ऐवजी उलट आप-णापासन ते अशी अपेक्षा करितात की, त्याच्यावर आपली असलेली कृपा व मशार-

निलेच्या वाडवडिलांशी आपल्या स्वर्गवासी वाडवडिलांचा परस्पर असलेला कृपासंबंध लक्षांत आणून आपण आपल्या कारभारीलोकांस असा हुकुम सोडावा की 'कमी केलेले एक हजार रुपये यंदा देऊन बरोबर आठ हजार रुपये करावेत.' **नबाब**साहेब जें बोलले ते आपणास निवेदन केले आहे. विशेष लिहून आपला वेळ घेत नाही. कळावे तारीख ११ रमजान १२०० हिजरी.

**अँड्र्यूज् रॅमसे**

---

**पत्रांक ७३** ॥ श्री ॥ **मॅकफर्सन्**

शके १७०८ आषाढ व० १० ता २०।७।१७८६ इ.

मे. **माधवराव नारायण पेशवा सवाई** यास — विशेष आपल्या फौजेशी अग्रेजी फौज मिळविण्याकरिता मला नागपूरची पत्रे **महादजी शिंद्या**कडून वारंवार मला आली आहेत व शिवाय मी ... खबरीवरून असे कळून समजतें की, आपल्या लष्कराशी सामना देण्याकरिता त्यांची फौज **टिपु सुलतान** तयार करीत आहे. इंग्रजी धर्मात **येशूचा** जन्मदिवस जो अत्यंत मंगल व शुभ असा लोक म्हणतात त्या तारीख २५ डिसेंबर रोजी आपले वकील **तिमणालाल** यास, **मुधोजी भोंसले** यांचे वकील **विश्वंभरपंडित** यास व **महादजी शिंद्यांचे** वकील **भगवंतराव** यास मी पुढीलप्रमाणें बोलणे केले— 'आम्हा सर्व इंग्रज लोकांचा पूर्ण हेतु असा आहे की, पूर्वी **पेशवे**सरकाराशी झालेल्या करारमदाराप्रमाणे परस्पर दोस्तीचा व एकीचा बाग एकीच्या विटेने एकजात होऊन उठवीत होतो व त्याच दोस्तीच्या बागतील कळ्या एकीच्या पाण्याने दिवसेंदिवस विकसित होवोत.' याच **प्रकारें** सदरहु वकीलमंडळीस समजाऊन म्हणालो की, "मिस्टर **मॅलेट**साहेब याच गोष्टीकरिता सरकारकंपनीकडून **पेशवा**साहेब यांच्या हुजूर गेलेले होते ईश्वरकृपेनें दोस्ती दुप्पट वाढविण्यात मी तत्पर राहीन" त्यास मी आणखी गोष्ट बोललो की, "जरी **टिपु सुलतान** व **धंरनी** याजमधील झालेल्या करारान्वयें शत्रूच्या ( **टिपुच्या** ) मुलखांत त्याच्या फौजेशी लढण्याकरिता **टिपुच्या** शत्रुत्वावर नजर देऊन **कंपनी**सरकारच्या फौजा पाठविणें हें जरी शक्य नाही, तथापि **पेशवा**साहेबांशी असलेल्या मैत्रीस व एकीस अनुसरून मुंबईच्या साहेबांस '**पेशवा**साहेबांस शत्रूशी लढण्याकरिता लागेल तितकी फौज तयार ठेवावी' याप्रमाणे लिहिलें जाईल." आपल्या वकीलानें ही गोष्ट आपणास सेवेशी जाहीर केली असेल अशी मला खात्री आहे. त्याच वेळी आपले खरे व अत्यंत स्नेही असलेले **नबाब निजामुल्मुल्क निजाम अलीखान बहादर** यास पुढीलप्रमाणे मजकूर लिहिलेला आहे. '**इंग्रज**साहेब व **नबाब**साहेब याजमधील झालेल्या करारनाम्यास अनुसरून इंग्रज-

साहेब हे मनापासून मदतीकरिता हजर आहेत. ज्या मार्गानें परस्पर दोस्ती व एकी वृद्धिंगत होईल —मी दिवसानुदिवस स्नेहवृद्धि व्हावी असें इच्छितें—त्या मार्गाशिवाय इतर मार्ग केव्हाहि ( स्वीकारला जाणार ) नाही." लाहोर कर्नाटक व बालाघाट या प्रांताकडून चोहोंकडून काही अफवा माझ्या कानी येत आहे. ही गप्प खरी अथवा खोटी कशीहि असो मी आपल्या स्नेहाच्या बाहेर कोणत्याहि प्रकारें नाही. मनापासून हजर आहे. ही गोष्ट आपणांस कळविणे माझें एक कर्तव्य समजून हें स्नेहपत्र **लाला चिमणलाल**—सरकारचे वकील—याजबरोबर माझ्याकडून आपल्या सेवेसी पाठविले जात आहे. या स्नेहपत्रासंबधी सविस्तर हकीकत सदर **चिमणलाल** यांच्या जबानीवरून आपल्या लक्षात येईल. मला आपला स्वतःचा अकृत्रिम स्नेही समजून हमेशा प्रेमपूर्वक कुशल कळवून आनंदवीत जाल अशी आशा आहे बहुत काय लिहावे ?

**जॉन मॅक्फर्सन्.**
२० जुलई, ८६

---

पत्रांक ७४ ॥ श्री ॥ **कॉर्नवॉलिस्**

शके १७०८ भाद्र. व. ५ ता. १२।९।१७८६ इ.

**श्रीमंत माधवराव नारायण सवाई पंडत प्रधान** यांस—विशेष. आज ता. १८ माहे जिल्काद स. १ २८ मवाफिक ता १२ माहे सपटंबर सन १७८६ इसवी रोजी मी गव्हर्नर जनरलीच्या कामकाजासंबंधी सर्व अधिकारासह विलायेतेहून कलकत्त्यास पोहोचून गव्हर्नर जनरलच्या गादीवर ( अधिकारावर ) बसलो. आपण व **कंपनी** सरकारामध्ये प्राचीन पासून सर्व जगास जाहीर असलेली मैत्री व एकी—पूर्वीच्या गव्हर्नर जनरलाशी चालत आल्याप्रमाणें—पक्की झालेली आहे. माझ्या अकृत्रिम स्नेहपूर्ण अंतःकरणात ईश्वरकृपेनें सध्या त्यांच्या पेक्षाहि जास्त मैत्री राखण्याबद्दल कळकळ वाटेल. व एकजीवाप्रमाणें दोस्तीच्या गोष्टी दिवसेंदिवस दुप्पट वाढतील हें अगदी पहिल्या प्रथम नजरेस येईलच. माझ्याकडुन दोस्तीच्या कामात कोणत्याहि प्रकारें केव्हाहि कसूर होणार नाही आपल्या कृपेनें मला खात्री वाटतें की, मला एक अकृत्रिम स्नेही समजुन आपली कुशलवार्ता कळवाल. व आपण केलेली सूचना अथवा आज्ञा—कोणत्याहि कामासंबंधी—केल्यास ती मला संतोषकारकच होईल. बहुत काय लिहीणें ?

**कॉर्नवॉलिस्**

---

पत्रांक ७५ ॥ श्री ॥ सयद नुरुद्दीन हुसेन

शके १७०८ कार्तिक व० ८ रा। ३०।१०।१७८६ इ

सरदार सेनापति कृपाळु गुणग्राही गरीबाचे कनवाळू **राव हरि पंडत** यास— स्नेहधर्मानंतर सेवेसी विनति कीं, आज ता० ७ मोहरम रोजी हें पत्र लिहिपावेतों माझी प्रकृती अमळ बरी झाली होती परतु हल्ली दुम्यार्ने अमल केला आहे. यापूर्वी आलेले पत्र कारभारी **नानासाहेब** याचे सेवेसी पाठविलेलें आहे त्यावरून इकडील सर्व माार समजून येईल. समक्ष भेट होईपावेतो आपल्या प्रकृतीचे व श्रीमत **नानासाहेबांचें** कुशल कळविण्याची आज्ञा व्हावी आपले वैभव व आयुष्य वाढो. विशेष.

---

पत्रांक ७६ ॥ श्री ॥ कॉर्नवॉलीस्

शके १७०८ मार्ग. शु १२ पा। २।१२।१७८६ इ.

अति थोर व उच्च पदवीचे व दोस्ताचे आधार **बाळाजी पडत** याचें ईश्वर रक्षण करो–अलीकडे हिंदुस्तान जिल्ह्यात तटेबखेडयाची आग उठली असल्यामुळें परस्परांतील गुप्त गोष्टी लिहून कळविण्याची फार शका व भीति वाटते. म्हणून आतां परस्पर गुप्त मजकूर साकेतिक शब्दानी अथवा चिन्हानी लिहिणे हाच दूरदर्शीपणाचा व शहाणपणाचा मार्ग दिसतो वरील अडचणीकडे नजर देऊन मी पत्र लिहिण्याचें मुद्दाम थांबलों आता साकेतिक शब्द व चिन्हें बसविलेला एक इग्रजी मसुदा मी आपल्या हातानें तयार करून तो मिस्तर **मॅलेट् साहेब** याजकडे पाठवित आहे सदर साहेबाकडुन त्यातील प्रत्येक अक्षर आपण तपशीलवार समजावून घेऊन त्याला इतके महत्वाचे समजावें की, जणू काय माझेंच बोलणे आहे तिकडील हकीकतीचे पत्र कुशलवर्तेसह वरचेवर लिहित असावे बहुत काय लिहिणे ?

कॉर्नवॉलिस्

---

पत्रांक ७७ ॥ श्री ॥ ( ? )

शके १७०८ १७८६ इ.

**नवाबसाहेब** ( ? ) यास—श्रीमत **दादासाहेब** याचा इग्रजाशी सलोखा झाल्यानतर झाशी तालुक्याकडे जाण्याचा विचार झाल्यावेळी **तुकोजीराव होळकर** व **महादजीराव शिंदे** याच्या फौजा **हरि बाबाजी** याच्या सैन्याधिपत्या-

---

१ याच मजकुराचें एक पत्र **श्रीमंत माधवराव नारायण पेशवे** यांच्या नावें आलेलें आहे. त्याची पैवस्ती तारीख १०।१२।८६ इ. आहे

खाली कायम होत्या. साप्रत, सदर फौजेशी लढाई करण्याकरिता श्रीमत **दादा-साहेब** हे तयार आहेत. आपणास कळावें म्हणून हें स्नेहपत्र पाठवीत आहे. **महादजीराव शिंदे** हेहि या कामात विशेष तजवीजीत आहेत. बहुत काय लिहिणे ?

---

**पत्रांक ७८** **॥ श्री ॥** **बॉडॅम्**

शके १७०८ वैशाख व० ३ रा॥ १६।५।१७८७ इ.

**श्रीमंत माधवराव नारायणराव पंडित प्रधान** याचे सेवसी–विशेष पाऊस सुरु होण्यापूर्वी विजयदुर्ग गिर्या (?) किल्ल्याच्या खर्चाकरितां उरणच्या खाडतून खाली धान्य सोडून देण्याची आपली इच्छा दर्शविणारें आपले रुपापत्र पोहोंचून मनास समाधान झाले याच बाबतीत मी आपल्या पहिल्या आज्ञेस नकाराचे उत्तरी तपसीलवार लिहिले आहेच. परतु अद्यापहि आपली ती आज्ञा मानली जावी अशीच आपली इच्छा आहे. जरी ही चाल वहिवाटीविरुद्ध आहे तथापि आपल्याविषयी माझ्या मनात जी हितबुद्धि आहे तिचें प्रत्यतर म्हणून व आपणास खुष करण्याकरितां व आपणहि माझे खरे हितचिंतक आहात व उत्तम तऱ्हेनें मुलखाची चिरकालीन आबादानी व्हावी या गोष्टी हल्ली परस्परात समाधानपूर्वक चालत आल्या आहेत म्हणून उरणच्या अमलदारास सदर गल्ला जकात न घेत व कोणतेहि प्रकारे हरकत न करितां सोडण्याबद्दल मी हुकूम पाठविला आहे. हें सर्व मी स्नेहाखातर केलेलें आहे हें आपल्या लक्ष्यात येईल अशी मला खात्री आहे. इतकेंच नव्हे तर मी आपला एक हितचिंतक, आपली गादी सुरक्षित राहो व परस्पर दोस्ती जास्ती होवो व उभय सरकारामध्यें सलूख राहो अशी इच्छा बाळगणारा असल्यामुळें ही गोष्ट घडून आली असे विचारपूर्वक समजून सरकारचे अधिकारी यापुढें अशा कामात दोस्तीमुळें कोणत्याहि प्रकारे हिला हरकत करणार नाहीत बहुत काय लिहिणें ? तारीख २७ रजब १२०१ हिजरी.

**माधवराव नारायण पेशवे** यास, **आर् एच्. बॉडॅम्.**

**मुंबई, १६ मे १७८७**

**वि थॉ सँडिफोर्ड**

---

**पत्रांक ७९** **॥ श्री ॥** **बॉडॅम्**

शके १७०९ ज्येष्ठ व० १३ रा॥ १२।६।१७८७ इ.'

**श्रीमंत माधवराव नारायण पंतप्रधान** याचे सेवसी—विशेष—आपले रुपापत्र बदर चेऊलचे सुभेदार **शीवप्रसाद** नावाचा यास कैद केल्याबद्दल मजकुराचें पोहोचले. परस्पर सरकारामध्यें स्नेहभाव दृढ होत असावा ही

जशी आपली इच्छा आहे त्याप्रमाणे माझीहि आहे. त्यास (¹) सोडण्याबद्दल पुष्कळ वेळां हुकूम दिलेले आहेत. या सरकारच्या मताप्रमाणे आपलहि मत, अजनवेलच्या गलबतानी तोकली नावाचे गलबत जप्त करून चेऊल बंदरास दोन वर्षापूर्वी नेलेलें आहे तें सोडण्याची तजवीज करावी, असे असेलच जरी **बंद्मल** हा आपल्या बरोबर कौलनामा येथून घेऊन जाण्याचा विसरला तथापि तें मालाचे गलबत इम-जाचें निःसशय आहे मिस्तर **मॅलेटसाहेब** याजकडे जें नोंदणीबुक रवाना केलेलें आहे त्याची नकल माझ्या नजरेस आली आहे. आपणासहि सदर गलबत सोडवून देण्याची आवश्यकता वाटेल अशी माझी खात्री आहे व याबद्दल चेऊलच्या सुभे-दारास हुकूम कराल अशी उमेद आहे बहुत काय लिहिणे ? ता० २५ माहे शाबान सन १२०१ ( हिजरी ).

**माधवराव नारायण पेशवे यास,** **आर्. एच्. बॉडॅम्**
**मुंबई**, १२ जून १७८७.
**वि थॉ. सॅडिफोर्ड.**

---

**पत्रांक ८०** **॥ श्री ॥** **कॉर्नवॉलिस्**

शके १७०९ आश्विन शु० ७ पा' १८।१०।१७८७ इ.

मे **बाळाजी पंडित** यांसी—

—विशेष—आपल्या व माझ्या परस्परातील मैत्रीचो व एकीची व सम-भावाची मर्यादा इतकी पक्की झालेली आहे की, जगात उदाहरणार्थ म्हणीदाखल ती झाली आहे. याकरिता जवळच्या व दूरच्या स्नेह्यास कळावें म्हणून हें स्नेहपत्र लिहिलें जात आहे की, राज्याची अतःस्थ गुप्त कारस्थानें माहीत असणे हें मोठ-मोठ्या सरदाराना व आधारभूत माणसाना आवश्यक आहे. म्हणून **कंपनी** अंग्रेज बहादरच्या ताब्यातील सुभ्यातील इंग्रजची ठाणी व इतर सुभे पाहून यावें असे मला योग्य वाटले. सबब माहे रमजानमध्यें माझा कूच करण्याचा हेतु कायम आलेला आहे. ठरलेल्या वेळी मनात योजिलेले काम करीन. आपणामध्ये व माझ्या-मध्ये परस्पर सबध व दोस्ती व एकी अगदी पक्की मजबूत आहे म्हणून वरील हकी-कत समजणे हें दोस्तीचे कायमचे चिन्ह समजले जाईल अशी मला खात्री आहे. पत्र म्हणजे अर्धी भेट आहे असे समजलें जाते. म्हणून वरचेवर कृपापत्र पाठविणें हा स्नेहधर्म जाणून खुषी करीत असावें, बहुत काय लिहिणे ?

**कॉर्नवॉलिस्**

---

पत्रांक ८१. ॥ श्री ॥ कॉर्नवॉलिस्

शके १७०९ आश्विन व० १० पा। ४।११।१७८७ इ.

मे. **बाळाजी पंडित यांस**–सलामत–सरकार **कंपनी** अंग्रेजबहादूर व सरकार **पेशवा**साहेब यामध्यें जो दोस्ती व एकी उत्तम प्रकारें मजबूत आहे तिला अनुसरून सरकार **पेशवा**साहेब याच्या वकिलाचा विश्वासूक भाऊ **लाला चिमणलाल** हा आपले कडून मिस्तर **जॉन मॅकफर्सन** साहेबाच्या अमलांत त्यांजकरिता कांही नजराण्यासह त्यांजकडे येऊन पोहोचला होता. परस्पर सरकारांच्या दोस्तीच्या पायाचा भक्कमपणा जगात लहानथोर माणसात म्हणीदाखल झालेला आहे. साहेब मजकूरहि दोस्तीच्या पायास चिकटून राहिल्यामुळें त्यांनी क्षुल्लक गोष्टीतहि हयगय केलली नाही. मीहि पूर्वीपेक्षा अधिक दोस्ती व एकी वाढविण्यांत मनापासून तत्पर राहीन. **लाला चिमणलाल** यानी आपलेकडे जाण्याकरिता मजपाशी परवानगी मागितली. त्याच्या विनतीप्रमाणें त्यांना रवाना केले व **पेशवा**साहेबाकरिता कांही नजराणा स्नेहाखातर अलाहिदा यादीप्रमाणें त्याच्या स्वाधीन केला आहे. श्रीमंत **पेशवा**साहेब यांच्या सेवर्सी स्वीकार होईल अशा योग्यतेचा हा नजराणा जरी नाही तथापि पूर्वीपासून स्नेहधर्म पाळून तो मजबूत करण्याकरितां पाठविला आहे. आपण त्याचा स्वीकार करून मला आभारी व आनंदी कराल अशी आशा आहे. वरचेवर तिकडील हकीकत व कुशलवार्ता कळवून खुषी करीत जावे. बहुत काय लिहावे ?

कॉर्नवॉलिस्.

---

पत्रांक ८२ ॥ श्री ॥ बॉर्डम्

शके १७०९ मार्ग० शु० १ रा। १०।१२।१७८७ इ.

**श्रीमंत माधवराव नारायणराव पंडित प्रधान** यांचे सेवेसी–विशेष–**बाबूजी भीमजी** व त्याचा वडील भाऊ यामधील बापाच्या मिळकतीबद्दल वाटणीच्या तंट्याबाबत मजकुराचे ता. १७ माहे मोहरम रोजी लिहिलेले आपले पत्र त्याचेच बरोबर उत्तम समयी प्रविष्ट होऊन अत्यानंद झाला. उत्तरी कलमी केले जाते की, ' आपली मिळकत त्याचेजवळच ( गुमास्त्याजवळ ) रहावी अथवा ती त्यानें यांच्या हवाली करावी अशी आज्ञा या भावाच्या बापानें आपल्या **देवीदास** नांवाच्या गुमास्त्यास केलेली दिसत नाही. द्वारकेमध्ये हल्ली असलल्या **भीमराव** नांवाच्या आपल्या मालकास पत्र पाठवून सदर मिळकतीसंबंधी पुढील तजवीज कशी करावयाची याबद्दल विचारण्यास मी त्या गुमास्त्यास हुकूम केलेला आहे.

तिकडून उत्तर येताच आपणास लिहून कळवीन, त्यावरून आपणास सविस्तर समजून येईल. बहुत काय लिहिणे ? तारीख ३० माहे सफर सन १२०२

**पेशवे** यास, **आर्. एच्. बॉडॅम्.**

**मुंबई,** १० डिसेंबर १७८७.

**वि. थॉ सँडिफोर्ड**

---

**पत्रांक ८३** **॥ श्री ॥** **बॉडॅम्**

शके १७०९ मार्ग० शु. १४ ता २३।१२।१७८७ इ

मे० **बालाजी पंडत नाना फडणवीस** यास—विशेष—हल्ली मुंबई बंदरचा अधिकार सोडून **जनरल** × × × च्या जहाजात बसून विलायतेस जाण्याचें ठरविले आहे. सबब आपणास खबर देत आहे. हेतु असा आहे की, जानेवारीच्या आरंभी जहाजावर स्वार होऊन रवाना होईन आपल्या मनातील कोणतेहि इष्ट कार्य माझ्याकडून होण्यासारखे असल्यास तावडतोब खबर द्यावी. व अशी खबर देणें दोस्तास अवश्य आहे आता मिस्तर **रामसे**-साहेब हे अधिकार चालवितील आपली जी आज्ञा असेल ती त्यांस लिहिली असता त्याप्रों घडून येईल. आपण नेहमी सुखी व आनंदी असावे अशी माझी इच्छा आहे. बहुता काय लिहिणे ? ता १२ रबिलावल

सन १२०२.

**नाना फडणवीस यांस,** **एन्. आर्. एच्. बॉडॅम्.**

**मुंबई,** २३ डिसेंबर १७८७.

**वि थॉ. सँडिफोर्ड**

---

**पत्रांक ८४** **॥ श्री ॥** **एन्. मॅकफर्सन्**

शके १७०९ १७८७ इ.

मे. **बाळाजी पंडित फडणवीस साहेब** यास—विशेष—मी आपल्या परमसुखदायी भेटीची अपेक्षा दर्शवीत आहे. आपलें स्नेहपत्र पोहोचून परम आनंद झाला. आपलें कुशल समजून समाधान झाले. मी आपल्या सरकारचा एक हितचिंतक असून दोघां सरकारामधील मैत्रीच्या भलाईची इच्छा करतों. व ही गोष्ट मी आपणास नेहमी जाहीर करीत आहे. परमेश्वराची कृपा अशी आहे की, पुष्कळ दिवस परस्परांत कोणतेहि प्रकारें भेद दृष्टीस पडला नाही. विलायतेंतील बादशाही बड्या सरदारांपैकी एक असलेले व हल्ली येथे बडेसाहेब असलेले **अर्ल् कॉर्नवॉलिस्** यांच्या व आपल्या बुद्धिमत्तेमुळे परस्परांतील मैत्रीरूपी बाग नेहेमी हिरवागार

राहील अशी मला खात्री वाटते. पूर्वीचे वडेसाहेब **जॉन् मॅकफर्सन्** बहादर कौन्सि-लांत सदर लॉर्डसाहेबांच्या जवळ असतात. व त्यांची त्याच्याशी विशेष दोस्ती आहे. **श्रीमंत राव** बहादर हे ज्या वेळी दोन वर्षांचे होते त्या वेळी हुजूर समारभास मी हजर होतो. अलीकडे रावसाहेब याची बुद्धिमत्ता, शौर्य, धैर्य वगैरेबद्दल ऐकून फारच समाधान झालें आपण सदर **राव**साहेबाच्या हुजूर माझी आठवण द्याल अशी आशा आहे. विशेष-आपले सर्व दिवस नेहमी सुखांत जावोत.

**एन्. मॅकफर्सन्** !

---

**पत्रांक ८५** **॥ श्री ॥** **कॉर्नवॉलिस्.**

शके १७०९ पौष शु० ३ ता ११।१।१७८८ इ.

**श्रीमंत माधवराव नारायण सवाई पंडत प्रधान** यांस—विशेष—फरुकाबादेपावेतो **कंपनी** अंग्रेज बहादरान्या खुद सुभ्यातील फौजेची पहाणी करुन मुक्काम करीत करीत मी ईश्वराच्या कृपेनें व मदतीने ता १६ सफर सन २९ रोजी सुखरूपपणें कलकत्त्यानजीक दाखल झालों. **कंपनी** सरकार व आपण यांच्यामधील परस्पर ऐक्यावर नजर देऊन हरएक गोष्टीची खबर देणें जरूर आहे नेहमी अपेक्षित कुशलपत्रे पाठवून आनंदवीत जाल अशी आशा आहे बहुत काय लिहिणें !

**कॉर्नवॉलिस्**

---

**पत्रांक ८६** **॥ श्री ॥** **बॉडम्**

शके १७१० आषाढ व० १४ ता ११८।१७८८ इ.

**श्रीमंत पेशवासाहेब माधवराव नारायण पंत प्रधान** याचे सेवेसी विशेष-आमच्या संबधात व्यापाऱ्याच्या जहाजावर भरलेल्या मालावरील करासुद्धां **कादरी** गुराब सोडून देणेबद्दल धोलकाचे सुभेदार यान्या नावें आलेले आपलें आज्ञापत्र त्यास दिलें. परतु मारनिल्हेनी सदर गुराब सोडलें नाहीं व किंमतीवरील करहि दिला नाही. या कारणामुळें आमच्या मनास फार आश्चर्य वाटले. पुन्हा त्या बाबतीत आपणास तसदी द्यावी असे माझ्या मनास अवश्य वाटलें. तरी हें स्नेह पत्र घेऊन येणाऱ्याबरोबर त्या मालाच्या किंमतीचा कर सोडणेबद्दल व गुराब सोडणे-बद्दल सक्त ताकीदीचे आज्ञापत्र कृपेनें द्याल अशी अशा आहे. म्हणजे असें झालें असता सदर इसम तें मजजवळ आणील नतर मी येथून स्वतःच्या माणसाबरोबर सदर सुभेदाराकडे पाठवीन व स्वतःच्या मतलबाकडे लक्ष्य ठेवून सदर गुराब व त्या मालाची रोकड कीमत आपल्या ताब्यात घेईन......विशेषः—

**पेशवे यांस** **आर्. एच्. बॉडम्.**

१ आगष्ट १७८८.

---

**पत्रांक ८७** ॥ श्री ॥ **विल्यम मेडोज्**

शके १७१० भाद्र० शु० ११ ता ११।९।१७८८ इ.

**श्रीमंत माधवराव नारायण पेशवा पंत प्रधान** यांचे सेवेसी ... सलामत–विशेष– ( अपेक्षित वेळेच्या ) अगोदर सुदैवयोगानें मी मुंबई बंदरास ता. ४ माहे जीइज्जे रोजी येऊन पोहोंचल्याबद्दल आपणास खबर देत आहे. व **ऑनरेबल कोर्ट ऑफ डायरेक्टर** यांचे हुकमावरून तावडतोब मिस्तर **रामसे** साहेबापासून अधिकाराचा चार्ज ( ताबा ) मी आपल्याकडे घेतला. आणि पुष्कळ दिवसांपासून दोघा राज्यकर्त्यांमध्यें परस्पर मजबूत असलेल्या स्नेहाबद्दल व एकी-बद्दल ऐकून फार आनंद झाला, माझ्या अधिकारात जितकी भलाई करणे शक्य आहे तितकी मी दाखवीन असा माझा हेतु आहे. व या माझ्या हेतूप्रमाणेच स्नेहपत्रें वरचेवर पाठवीत जाऊन भलेपणा राखण्याचा आपलाहि हेतु असेल अशी माझी खात्री आहे. स्नेहवृद्धीची इच्छा असावी यापेक्षां जास्त काय लिहावे ? आनंदाचा काळ नेहेमी असो. तारीख ९ माहे जिल्हेज. सन १२०२

**पेशवे यांस** **विल्यम् मेडोज्**

**मुंबई** ११ सपटेंबर १७८८

**वि. थॉ. सॅंडिफोर्ड.**

---

**पत्रांक ८८** ॥ श्री ॥ **जेमस् हर्टले**

शके १७११ ज्येष्ठ व० ९ ता १७।६।१७८९ इ.

मे० **बाळाजी पंत जनार्धन यांसः**— विशेष–भेटीची अपेक्षा दर्शवून कळवितों की, आपलें कृपापत्र **रघुनाथ रणछोड वकील** यांजबरोबर आलें तें उत्तम समयी प्रविष्ट झालें. त्यांतील मजकुरानें अन्तःकरण आनदास्वादित झालें. व सर्व मजकूर ध्यानी आला. व मशारनिल्हेच्या जबानीवरूनहि समजला व हे एक माझ्या खुषास कारण झालें. याचप्रमाणें मला आपल्यापैकीच एक असे समजून कोणत्याहि कामाबद्दल आज्ञा व्हावी अशी अपेक्षा आहे. त्यात माझ्याकडून बिलकुल कसूर होणार नाही. बहुत काय लिहिणें ?

---

**पत्रांक ८९** ॥ श्री ॥ **कॉर्नवॉलिस्**

शके १७११ माघ० व० ४ ता ३।१।१७९० इ.

**श्रीमंत सवाई माधवराव नारायणराव पंडित प्रधान** यांस— विशेष—प्रीतीनें भरलेलें, समाधानयुक्त असें आपलें कृपापत्र व सोबत त्या प्रांता-तील दुर्मिळ वस्तूंचा नजराणा मेहरबान मिस्तर **मॅलेटसाहेबा**मार्फत आला तो उत्तम-

समयीं पोहोंचून अन्तःकरणरूपी बागेस टवटवी आली व हेंच पराकाष्ठेच्या दोस्तीचें व प्रमाचें प्रमाण आहे. आपणांमधील परस्पर दोस्तीचें नातें व अंतःकरणापासूनच्या एकीचा दर्जा हे वज्राप्रमाणे दृढ झाले आहेत. प्राचीनपासून चालत आलेल्या दोस्तीचा धागा रक्षण करण्याचा परस्पर हेतु असल्या-मुळेच आपण हा बेहेंगामी वस्तचा नजराणा—ज्याच्यापेक्षा अधिक उत्तम असा नजराणा असेल अशी कल्पना करणे शक्य नसलेला—आपण पाठविला त्यामुळें या अकृत्रिम स्नेह्यास फारच आनंद वाटला मी आपला स्नेही या नात्याने असें लिहिणे हें बहिवाटीविरुद्ध समजलें जाईल तथापि मला आपले उप-काराचा उल्लेख केल्यावाचून दम निघतच नाही आपणा दोघामध्यें बरोबर असा ( नजराण्याचा ) प्रकार घडण्यामध्यें परिणाम येवढाच की, उपकार हा होय. सदरहू जिनसाची किमत व महत्त्व परस्परांच्या मलखातील तज्ज्ञ व्यापारी लोक उत्तम प्रकारें जाणतात. माझ्या अन्तःकरणांतील हेतु **मिस्टर मालेटसाहेब** याच्या मार्फत आपणास समजतील. आपल्या कृपापत्राची अपेक्षा करणारा व आपल्या महत्त्वाची इच्छा करणारा असे मला समजून वरचेवर (पत्रद्वारें) आठवण करीत जावी. बहुत काय लिहिणे ?

**कॉर्नवॉलिस्.**

---

**पत्रांक ९०** || **श्री** || **कॉर्नवॉलिस्**

शके १७११ फाल्गुन व० १ ता० २।३।१७९० इ

**श्रीमंत सवाई माधवराव नारायण पंडत प्रधान** यास विशेष—या-पूर्वी **टिपू नायकानें** कौलकराराविरुद्ध केलेल्या वर्तनाबद्दल व त्यानें द्वेषरूपी सां-ळीस चालना दिल्यामुळें त्या गोष्टीचा बंदोबस्त करण्याकरिता माझा **चिनापटणा-कडे** जाण्याचा हेतु असल्याबद्दल मजकुराचें पत्र इकडून पाठविलेलें पोहोंचून व वाचून आपणास सर्व मजकूर समजला असेलच. तें पत्र रवाना केल्यावर **कंपनी** अंगरेज सरकारानी **जनरल मेडोज्** सेनापति यास चिनापटणच्या गव्हर्नरच्या अधिकारावर नेमिले आहे असें समजलें. सदर सेनापति साहेबाची बुद्धिमत्ता, चतुराई, शौर्य व कामाकाजाचा अनुभव याबद्दल मला पूर्ण भरवसा आहे. ही खबर सम-जल्यामुळें माझा चिनापटणास जाण्याचा बेत रहीत केला. ही खबर आपणास कळ-विणे जरूर समजून मुद्दाम हें स्नेहपत्र पाठवीत आहे. हरप्रकारें आपला एक कुशल-चिंतक मला समजून वरचेवर पत्रें पाठवून खुष कराल अशी आशा आहे. वरकड मजकूर मिस्तर **मॅलेटसाहेबाच्या** जबानीवरून कळून येईल. बहुत काय लिहिणें ?

**कॉर्नवॉलिस्.**

---

**पत्रांक ९१** ॥ श्री ॥ **कॉर्नवॉलिस्**

शके १७१२ वैशाख शु० ६ पा ४।५।१७९० इ.

**श्रीमंत माधवराव नारायण सवाई पंडत प्रधान** यास—विशेष. इकडील स्नेहपत्राच्या उत्तरीं 'आपलेकडून **लाला सेवकराम** याच्या मार्फत नजरनजराणे आले ते पोहोचून परम संतोष व स्नेहवृद्धीचें दर्शक असे वाटले' या मजकुराचें आपलें पत्र आलें तें पावलें त्याचप्रमाणें मिस्तर **मालेट** साहेब याजमार्फत आपलेकडून त्या प्रांतातील वस्तूंचा नजराणा आला तो पोहोंचला, आपलेकडील पत्राचें उत्तर आलेल्या नजराण्यांच्या वस्तूंच्या यादीसह पाठविले आहे मिस्तर **मॅलेटसाहेबांच्या** मार्फत आपणास तें मिळेल नेहमी माझ्या नजरेसमोर असलेल्या जुन्या दोस्तीचा संबंध आपल्या लक्षात येईल. आपल्या भेटीचें सुख मिळेपावेतों याचप्रमाणें वरचेवर पत्रें पाठवून आनंदवीत जाल अशी आशा आहे. बहुत काय लिहिणें ?

कॉर्नवॉलि[illegible]

---

**पत्रांक ९२** ॥ श्री ॥ **कॉर्नवॉ[illegible]**

शके १७१२ वैशाखानंतर मे १७९० इ. नंतर

**पंडित साहेब** यास—विशेष–आमच्या लष्करच्या काही पलटणी लष्करात दाखल होण्याकरिता घाटमार्गें येत आहेत. सबब सदर पलटणीच्या येण्याचा मार्ग आपल्या लष्करातून आहे. साठी, स्नेहपूर्वक लिहीत आहे की, सदर पलटणीचा एक साहेब माणूस आपल्या सेवसी जात आहे, तरी आपल्या लष्करातून सदर पलटणीस रस्ता देणेबद्दल आपल्या कामगार अधिकाऱ्यांचे नावें एक परवाना सदर साहेबापाशी द्याल अशी आशा आहे. बहुत काय लिहिणे

कॉर्नवॉलिस्

---

**पत्रांक ९३** ॥ श्री ॥ **कॉर्नवॉलिस्**

शके १७१२ श्रावण व ४ पा २८।८।१७९० इ

मे. **माधवराव नारायण पेशवा**—यास–विशेष–नवाबसाहेब वाला कदर **नवाब वजीरुल मुमालिक** बहादूर यांनी तीर्थ प्रयाग ऊर्फ अलाहाबाद येथे यात्रेकरूंवरील कर पूर्वीपेक्षां फार कमी केला असल्याबद्दल खबर मला माहीत होण्याकरितां कृपेनें कळविली, व मी स्नेहाखातर सदर नवाबसाहेबांनी पाठविलेल्या त्या पत्राची नक्कल करून काळजीपूर्वक आपणाकडे पाठवीत आहे. **नवाबसाहेब** मजकूर यांच्या मनांत विशेष दया असल्यामुळें यात्रेकरूंची **सुखसोय** विशेष करून

पढाण्याची त्याची इच्छा असलेली ते उत्तमप्रकारें अमलात आणतील अशी मला खात्री वाटते. वरकड गोष्टी मिस्टर **मॅलेटसाो** बहादर याच्या सांगण्यावरून आपणांस कळून येतील. मला आपण आपला एक हितचिंतक जाणून नेहमी कुशलपत्र पाठवून आनंदवीत जावे. कळावे बहुत काय लिहिणें !

**कॉर्नवॉलिस्**

---

**पत्रांक ९४** **॥ श्री ॥** **कॉर्नवॉलिस्**

शके १७१२ मार्ग० शु. १३ ता। १९।११।१७९० इ.

**श्रीमंत माधवराव नारायण सवाई पंडित प्रधान** यास-विशेष--

आशाच्या कृपेनें व मदतीनें ता० १८ माहे आक्टोबर रोजी रात्री किल्ला नंदीदुर्ग ऊर्फ गर्दूनशिकोह (शत्रूचा बळकट किल्ला) विजेयी फौजेच्या हिंमत बहादराच्या हल्ल्यानें जिंकला गेला. दुर्गभेदक व अत्यंत बलाढ्य अशा (आपल्या) लोकांच्या जंगली लढाऊ सिंहाप्रमाणे हिंमतीच्या धडाडीने किल्ल्यातील वेढलेले लोक शेळीच्या कळपाप्रमाणे जागा सोडून पळून गेले त्याच्या दुर्दैवानें ती वेळ रात्रीची झाल्यामुळे किल्ल्याच्या तटावरून दोऱ्या टाकून खाली उतरून पळून गेले. काही लोक मारले गेले व काही ईश्वराच्या कोपरूपी दोरीत किल्ल्याबरोबरच कैद केले गेले हा ताजा विजय पुढील दिवसानुदिवस वाढणाऱ्या वैभवाचे पूर्वचिन्हच होय. या गोष्टीमुळे तो ईश्वर आपणास व सर्व स्नेह्यास सुखी राखो. किल्ला मजकूर जिंकणे फारसे जरूर नव्हते, परंतु, असला बळकट किल्ला शत्रूच्या ताब्यात असणें म्हणजे गरीब बिचाऱ्या येणाऱ्या जाणाऱ्यास एक मोठी अडचण होती. सदरहू जमीन तिघांहि दोस्त सरकारांच्या फायद्याची नव्हती असे नाही. म्हणूनच त्याकरिता इतकी खटपट केली. व (वाटेंतील) त्यांचा असलेला कांटा उपटून टाकला व्यापाऱ्यास आता लष्कराकडे रसदगल्ल्याची नेआण करण्यास कोणताहि त्रास होणार नाही. ईश्वरकृपेनें व स्नेह्याच्या सदिच्छेने याचप्रमाणे इतर सर्व कामे मनाप्रमाणें शेवटास जातील. आपण आपलें कुशलवृत्त वरचेवर कळवून खुष कराल अशी आशा आहे. बहुत काय लिहिणें !

**कॉर्नवॉलिस्**

---

**पत्रांक ९५** **॥ श्री ॥** **कॉर्नवॉलिस्**

शके १७१२ मार्गशीर्ष- डिसेंबर १७९० इ.

**पुरवणी—**

प्रसंगामुळे जवळ असलेल्या काही तोफा व मोरचाल टाकून दिल्या होत्या. परंतु नंतर लवकरच कावेरीतीरापासून ते थेट गंजाम शहरापावेतों शत्रूस नेण्यास

अशक्य झालेलें तोफासह मोरचाल ईश्वरकृपेनें व सेन्यांच्या सदिच्छेनें सरकारच्या ताब्यांत पुन्हां आलें. व त्या अवघड ठिकाणी सरकार **कंपनी** अंग्रेज बहादूर याचें ठाणें कायम झालें. शत्रूपैकी कोणीहि माणूस माझ्या विजयी सैन्यास तोंड देण्यास धजला नाही. आपणांस कळावें म्हणून हें स्नेहपत्र लिहिलें आहे. बहुत काय लिहिणे ?

**कॉर्नवॉलिस**

---

**पत्रांक ९६** **॥ श्री ॥** **कॉर्नवॉलिस**

शके १७१२ माघ व० ३ पा। २१।२।१७९१ इ.

मेहरबान **रावसाहेब** यास (1) —विशेष—इकडील माझ्या अंतःकरणांतील **टिपू नायकाच्या** बाबतीतील कामाची वाट काय लावावी याबद्दल दुर्लक्ष्य न करण्याजोग्या गोष्टी आपणास मिस्तर **मालेट** साहेब बहादूर यांनी उत्तम प्रकारें समजाऊन सांगितल्या असतील. या बाबतीत पुन्हा आपणास तसदी देण्याची जरूरी काय आहे ? यापूर्वीचा सर्व विशेष प्रसंग लक्षात आणितां सांप्रत आपणा परस्परांत असलेल्या पक्क्या मैत्री व करारमदाराप्रमाणे वागणूक व भलाई यांवर नजर देऊन जुलूम नाहीसा करणें व तंटा मिटविणें व साथीदार मित्राचा फायदा वगैरे करण्यामध्यें शक्य तितका मी गाफील रहाणार नाही कारण, यापूर्वी आपणहि या बाबतीत केलेले परिश्रम व प्रयत्न पाहून मला फारच समाधान वाटतें. व म्हणून हें पत्र मी लिहीत आहे मला इतका अमर्याद आनंद होत आहे की, तो मी वर्णन करू शकत नाही. तो सर्वकर्ता परमेश्वर शत्रूचा निःपात करण्याबद्दल आपल्या सुखदुःखाच्या वाटेकऱ्याच्या मनात प्रेरणा करो. ईश्वरकृपेनें परस्पर मैत्रीचा करारमदार पूर्णतेस गेलेला आहे सदर करारांत मुख्य गोष्टीकडे पाहिलें तर ती लोभी शत्रूस शिक्षा करणें व त्याचें कान उपटणे ही होय. व ती ईश्वर पूर्ण करो. तिन्ही सरकारामधील दोस्तीचा दर्जा वाढावेण्याकरिता शक्य तितकी खटपट जगाच्या अस्तित्वापावेतों प्रत्येक सरकार अमलांत आणीत आहे. सद्यःस्थितिसंबधी माझ्या मनातील गुह्य गोष्टीमध्ये ईश्वरकृपेनें काहि अडचण न आली तर मनाप्रमाणें त्याची तजवीज होईल क्वचित् मनुष्याला प्रतिरोधाचीहि मुभा नसते. माझी विश्वासपूर्ण इच्छा अशी आहे की, सांप्रत बंगाल प्रांताची राज्यव्यवस्था उत्तम तऱ्हेनें चालली आहे. चिनापट्टणसंबधी सुद्धा मी स्वतः तिकडे जाऊन **टिपु मजकुराचे** राजकारण सबडीने तडीस लावण्याचा विचार आहे. याबद्दल पूर्ण विचार मनात केला आहे. चिनापट्टणसंबधी कारभारहि बंगालप्रमाणेच माझ्या हातात आहे. व सरकार **कंपनी**ची सर्व कामकाजासंबधी बढती जेथे त्याचा संबंध आहे तेथे व्हावी हा माझी भावना आहे. त्याचप्रमाणे आपल्या व **कंपनी** सरकाराचे दरम्यान असलेल्या दृढ व जुन्या दोस्तीमुळे आपल्या पुण्याकडील कारभाऱ्यासंबधीहि मला वरील प्रमाणे

वाटतें व म्हणून **टिपूनायकाचा** झगडा मिटविणे हें अवश्य आहे ईश्वरकृपेने तिन्ही-सरकारामधील दृढ असलेल्या करारनाम्यातील भागीदारीचा मजकूर मला पूर्ण समत आहे सबब पूर्ण विचाराती असे ठरवून लागलीच ठरलेल्या जागी जाण्याकरिता जहाज तयार ठेवण्यास सांगितले आहे वचनाप्रमाणें क्रिया प्रत्यक्ष करून दाखविण्यापविना पुण्याच्या कारभाऱ्याशी माझी दोस्ती आहे ही खात्री मनांत समजून मी तिकडे जाण्याचा इरादा करीत आहे आपण मला आपल्यापैकीच एक आहे असे जाणून व कामें तडीस लावण्यास योग्य समजून चालावें. मीहि आपणास तसेच **समजतों.** इकडाल वरकड वर्तमान मिस्तर **मालेटसाहेबांस** माझेजागी समजून तपसीलवार इत्थंभूत त्याजमार्फत मला कळवावी. मीहि आपणास असेच कळवीन. बहुत काय लिहणें ?

**कॉर्नवॉलिस्.**

---

**पत्रांक ९७** **॥ श्री ॥** **कॉर्नवॉलिस्**

शके १७१२ फाल्गुन व० ३. ता० २३।३।१७९१ इ.

रावसाहेब मेहरबान दोस्ता **हरिपंत फडके** यास—सलामत्—आपल्या सांगण्यावरून लिहिलेल्या मिस्तर **मॅलेटसाहेब** बहादूर याच्या पत्रावरून पुणे मकामाहून आपली रवानगी व श्री. सरकार **माधवराव नारायण सवाई पंडत प्रधान** बहादूर यांचे लष्करासह कूच व पोहोंचणे वगैरे तपसीलवार मजकूर मला समजून अमर्याद खुषी व आनंद वाटला. सरकार मजकुराच्या मोठेपणाविषयी व अभ्युदयाविषयी आपल्या अंतःकरणात विशेष आस्था व हितचिंतन कायम आहे. **पेशवे** सरकार, **निजाम** सरकार, व **इंग्रज** सरकार याच्या परस्पर दोस्तीसंबंधी आपणा-कडे सोंपविलेली कामे पार पाडण्यात आपलें अंतःकरण तत्पर असतें वास्तविक, सरकार **कंपनी** व **नबाब**साहेब यांचे झेंडे जेथे कायम केले आहेत तेथें सोंप-विलेली कामगिरी पार पाडण्याकरिता आपणास सैन्याचें आधिपत्य व अधिकार देऊन नेमलें ही गोष्ट समजून **पेशवा**साहेब बहादूर याचा अनुभव व धाडस पाहून मला इतका पराकाष्ठेचा आनंद झालेला आहे की, तो मोठमोठी दप्तरें लिहून सुद्धा दर्शविणें अशक्य आहे. या आपल्या सोंपविलेल्या कामात मोठ्या अब्रूनें व यशानें ईश्वर कृपा करो व तिन्ही सरकाराच्या कामकाजाचा बोज राखो आता, मी निव-डक फौज व अनुभवी स्वार व मनाप्रमाणे तोफखाना व दुर्गभेदक तोफा यासह कोलार मुकामी सुखरूप पोहोचून एक तासाचाहि विलंब न करिता बंगलोर किल्ला वेढण्याकरिता रवाना होत आहे ईश्वराच्या कृपेनें व स्नेह्याच्या प्रेमाने थोड्याच अव-काशात तेथे पोहोंचेन. **नबाब निजाम अलीखान** बहादूर यांनी तिन्ही सरकार-

सबधी आपली कामगिरी बजावण्याकरितां मेहरबान **राजा तेजवंत बहादर** यास अधिकार देऊन विजयी फौजेसह शत्रूच्या मुलखात गजीकोट्यानजीक आपले निशाण उभारले मुक्काम मजकूर व कद्काह येथें असलेली माझी विजयी फौज याजमध्ये फारसें अंतर नसल्यामुळे सदर **राजासाहेब** याच्या नावे पत्र माझ्या लष्करास आपल्या फौजेसह येऊन मिळावें व भागीदारीने एकीच्या फायद्यांत आम्हास सामील व्हावे म्हणून लिहिले जात आहे. ईश्वर आपल्या प्रयत्नास उत्तम फळ येऊन सोपविलेल्या कामात उत्तम प्रकारें यश देवो. मी सरकार नामदार **पंडत प्रधान पेशवासाहेबांस** व सरकार **नवाब निजाम अलीखांबहादर** यास या लढाईचा शेवट उत्तम प्रकारें करणामध्ये **कंपनी** अंग्रेज बहादराप्रमाणेंच विशेष लक्ष्यपूर्वक तत्पर आहात असें व दूरदर्शी मुत्सद्दीच्या व विश्वासूक थोर सरदाराच्या प्रमाणें आपणहि खटपट व परिश्रम भागीदार दोस्ताची कामे पार पाडून फायदे करण्याकरिता शक्य तितके मनःपूर्वक करीत आहात हे जाणून मी आपला सल्ला विचार घेत आहे ईश्वरकृपेनें ज्याच्या स्नेहाचा व एकीचा धागा अंतःकरणात पर्वताप्रमाणे स्थिर व कायम आहे त्या थोर व सन्मान्य सरदाराच्या मनातील हेतु निःशंकपणें आपल्या भागीदारांच्या कामत परस्पर मदतीने यश व भरभराट प्राप्त व्हावी असा आहे व पुढेंहि तो राहील, या लढाईतील प्रत्येक भागीदाराच्या विजयी सैन्याचा पराक्रम व परिश्रम तिन्ही फोजा एक ठिकाणी झाल्यामुळें ताबडतोब व मनाप्रमाणे दिसून येईल आपण आपल्या बुद्धीने तुलना कराल की, आपले स्वतःचे सैन्य माझ्या सैन्यास मिळवाल तर मनाप्रमाणे यशप्राप्ति होऊ शकेल वास्तविक, याप्रमाणें केले असता मला फार सुखकारक होईल किंवा आपल्या बरोबरचे **पंडित प्रधान** याच्या सैन्याकडुन कूच करविणे व माझ्या लढाईच्या मुकामाजवळ फक्त तें आणुन आपले इष्ट हेतु साधण्याकरिता योग्य ती खटपट अमलात आणणे यापैकी कोणता मार्ग उत्तम व सुखाचा दिसेल ? दोघाच्या फौजा एकत्र करणे आपणास योग्य वाटल्यास मी देखलि या गोष्टीस महत्व समजुन चालू कामाचा शेवट उत्तम प्रकारे लावण्याकरिता आपणाशी सल्लामसलत घेणें हें मी समाधानाचें कारण समजेन. वरकड, मला आपला हितचिंतक समजुन वरचेवर पत्रे लिहून खुष करीत असावें बहुत काय लिहावें ?

**कॉर्नवॉलिस्**

---

**पत्राक ९८** **॥ श्री ॥** **कॉर्नवॉलिस्**

शके १७१३ भाद्र शु. ५ पो ३।९।१७९१ इ.

**श्रीमंत पंडत प्रधान महाराजाधिराज सवाई माधवराव नारायण बहादर** यास विशेष. विजयी फौजेच्या पराक्रमानें व **परशरामभाऊ साहेबांच्या**

बुद्धिकौशल्यामुळे धारवाडचा किल्ला जिंकल्याबद्दल व तेथे आपले ठाणे कायम झाल्याबद्दल मजकुराचे आपले कृपापत्र उत्तम समयी पावले व त्यामुळे इष्ट वा... समजली. आपणामध्ये असलेल्या परस्पर दोस्तीमुळेच मी हे पत्र आपणास लिहित आहे. आपली फौज शूर व अब्रूदार असल्याचे सगळ्या हिंदुस्तान व दक्षिण देशात प्रसिद्ध आहे. खरोखर ती आपले शिपाईगिरीचे कामात पटाईत आहे तिचे सरदाराची बहादरी व भाऊसाहेबाचे धोरणामध्ये अग्रेसरत्व या सर्व आपल्या कल्याणाच्या गोष्टीचा योग जमून आल्यामुळें ही गोष्ट घडून आली. आपली फौज लढाईच्या इरायानें जिकडे फिरेल तेथे तीस विजय खास मिळेल व जरी वज्राप्रमाणे दुर्भेद्य असा शत्रूचा किल्ला असला तरी तो आपल्या विजयी फौजेच्या ताब्यात येईल अशी मला खात्री वाटते हल्ली ईश्वरी गुप्त रुपेनेंहि तिरा सरकारांची विजयाची आनंद-कारक वार्ता चारी बाजूने मनुष्यास समजली आहे. त्यामुळें दोस्ताचे अन्तःकरण प्रफुल्लित झाले आहे व शत्रूचे संकोच पावलें आहे मला ही खबर समजून इतका विलक्षण आनंद झालेला आहे की त्याचा उल्लेख या एवढयाशा पत्रात करता येणार नाही पुढे होणाऱ्या उत्तरोत्तर विजयाची ही एक प्रस्तावनाच आहे. यापासून आपणा सर्व दोस्त मंडळीस सुख होवो मी आपला एक हितचिंतक जाणून नेहमी कृपापत्र पाठविण्याची तजवीज व्हावी बाकी गोष्टी मिस्तर **मालेट साहेबा** मार्फत समजतील बहुत काय लिहिणे ?

कॉर्नवॉलिस्

---

**पत्रांक ९९** **॥ श्री ॥** **कॉर्नवॉलिस्**

शके १७१३ आश्विन शु० ९ रा ६।१०।१७९१ इ

**मे हरिपंडित साहेब** यास — विशेष उद्या जगातील रहिवाशाच्या अंतःकरणरूपी बागेला टवटवी आणणारा असा सौख्यवर्धक दसरा सणाचा मंगलकारक दिवस आहे. ज्या अर्थी या सुखकारक दिवसाला आपला सर्व परिवार व जरीपटका हे मिरवणुकीकरिता शोभा आणणारे व आपणास खुषी करणारे आहेत त्या अर्थी एक हत्ती मित्रत्वाच्या नात्यानें शकुनार्थ मी आपणांकडे पाठवीत आहे. जिच्यामुळे परस्पर दोस्तास खरें सुख होतें त्या परस्पर दोस्तीच्या व एकीच्या सांगडीमुळे आपण या हत्तीचा स्वीकार केला असता मला फार आनंद होईल. बहुत काय लिहिणे ?

कॉर्नवॉलिस्

---

**पत्रांक १००** ॥ श्री ॥ **कॉर्नवॉलिस्**

शके १७१३ मार्ग० व० ३ पा। १३।१२।१७९१ इ.

**श्रीमंत माधवराव नारायणराव पंडत प्रधान** यास—विशेष चिनापटणास जाण्याचा इरादा असल्यावरून मला बसण्याजोगें जहाज तावडतोब तयार करण्याचा वगैरे माझा हेतु असल्याबद्दल पूर्वी मी आपणास पाठविलेल्या पत्रावरून सवेस्त समजलें असेलच व शिवाय मेहरबान **मॅलेटसाहेबांनीं** आपल्या सत्यवादी वचनावरून इकडील हेतुबद्दल सविस्तर हकिकत आपणांस समजाविली असेलच. ईश्वराच्या कृपेनें व मित्रांच्या सद्वेतूनें लवकरच थोड्या अवकाशात कलकत्याहून चिनापटणास ता० ६ माहे रबिलाखर रोजी पोहोंचलों. आपणामधील परस्पर कायम असलेल्या जुन्या दोस्तीवर नजर देऊन मी या मुकामी येऊन पोहोचल्याबद्दल खबर न देणं म्हणजे परस्पर एकचित्तपणाच्या बाहेरची गोष्ट करण्यासारखें होईल म्हणून तावडतोब या स्नेहपत्रानें लिहीत आहे ईश्वर या स्नेहास विजयाचे व परस्पर इष्टसिद्धिचें साधन करो. हल्लीच्या दोस्तीच्या काळात आपणा परस्परात दुही होणें शक्य नाही अशी मला ईश्वराच्या कृपेने पूर्ण आशा आहे. हीच आशा मी कलकत्त्यास होतो तेव्हापासूनच ईश्वराच्या पूर्ण कृपेनें करीत आहे पूर्वीप्रमाणेच आपणामध्यें परस्पर अंतःकरणांतलि गुप्त गोष्टीचा पत्रद्वार अधिकाअधिक संबंध जडेल. **मॅलेटसाहेबांच्या** पत्रात इकडील सविस्तर मजकूर आपणास कळविण्याकरिता लिहिला आहे तो ते आपणास निवेदन करतील. बहुत काय लिहिणे ?

**कॉर्नवॉलिस्.**

---

**पत्रांक १०१** ॥ श्री ॥ **कॉर्नवॉलिस्**

शके १७१३ मार्ग० व० ११ रा। २१।१२।१७९१ इ

**श्रीमंत पेशवासाहेब** यासः— चारी दिशेनें ताज्या जयाची आनंददायक वार्ता आमच्या कानी शुभसमयी आली. प्रत्येक देशाकडून व शहराकडून येथील रहिवाशांच्या कानी जयाची खबर आली. ज्याच्या बळकटीबद्दल जगात प्रसिद्धि म्हणी प्रो आहे असा या देशातील बळकट व निवडक किल्ला सावनदुर्ग ऊर्फ **माकसरली** ( ? ) ता. २४ माहे रबिलाखर रोजी ज्याची दोस्ती व एकी ईश्वरकृपेने पर्वताप्रमाणें स्थिर आहे अशा सहकारी दोस्ताचें शुद्ध मन व ईश्वराच्या ठिकाणी भाव यामुळे व **कंपनी** अंग्रेज बहादूर यांच्या विजयी फौजेच्या पराक्रमानें केलेल्या हल्ल्यामुळे दहितास दिवस होताच हातात आला. ( जिंकला ). त्याचे फार लोक मारले गेले व बरेच कैद केले गेल्यामुळें शत्रूच्या मनांत अनावर दरारा बसून ते खिन्न झाले आहेत. अशा प्रकारचा विजय मिळणे हें दोस्ताच्या अंतःकरणात अत्यंत उल्हास

कारक आहे. **हरिपंडित तात्यासाहेब** हे आमच्याबरोबर असल्यामुळें दोस्ताच्या परस्पर भरभराटीच्या दृष्टीने उभयाच्या मनास संतोष आहे. तथापि आपण दूर असल्यामुळे आपणास परस्पर कामाबद्दल खुषी करण्याकरिता आपले अभिनंदन करात आहे. ईश्वरकृपेनें परस्पर हेतुप्रमाणे दिवसेंदिवस भरभराट आहे ईश्वर या गोष्टीमुळे आपणास व आपल्या मित्रास हजारपटीने सुखी ठेवो वरकड मजकूर **सर चार्लस वार मॅलेट** साहेब हे तोंडी जाहीर करतील. तिन्ही सरकारच्या परस्पर सबधात मला आपला भरभराट इच्छिणारा एकजीव स्नेही समजून वरचेवर कुशलवार्ता लिहून व तिकडील वर्तमान कळवून आनंदवीत जावे. बहुत काय लिहावें ?

**कॉर्नवॉलिस्**

---

**पत्रांक १०२** **॥ श्री ॥** (?)

शके १७१३ १७९१ इ

मेहरबान मुहिब्बान् सलामत् (१) यापुर्वी मेहरबान **परशराम** यानी किल्ल्यास वेढा दिला. तेथील किल्लेदार **खानानें** व इतर वेढले गेलेल्या इसमानी लढाईत जातीने मुळीच कसूर केली नाही. तथापि किल्ल्यातील वेढलेले लोक अगदी निरुपाय होऊन तंगीस लागले. अखेरीस सदर लोक ता २ शाबान रोजी स्वतःच्या प्राणरक्षणाकरिता बाहेर पडले व सरकारचे ठाणें सदर किल्ल्यामध्ये बसले या गोष्टीमुळे ईश्वर स्नेह्यास व विशेषतः आपणास मगल करो मी ता १ माहे मजकूर रोजी **नबाब-आसफजहा** याचेकडून रवाना होऊन मोपला फौजेत तुंगभद्राकाठी घाट उतरून तळ दिला होता तेथे दाखल झालों. ता. १० माहे सदर रोजी श्रीमत **पेशवे** याच्या व **मदारुल् महाम**च्या आज्ञेप्रमाणे चिरंजीव **लक्ष्मणराव लॉर्ड कॉर्न-वॉलिस्** याच्या फौजेशी मिळण्याकरिता बड्या सरदाराबरोबर रवाना झाला आहे सदर चिरंजीव हा कूच दर कूच करून गजेंद्रगडामार्गे इंग्रज **कंपनीच्या** फौजेस सामील होऊन जनरल मजकूराची भेट घेईल मी कर्नूलपासून दोन कोसाच्या अंतरावर सदर नदीकाठी आहे. कळावें म्हणून लिहिले आहे. आपण कृपापत्र पाठवाल अशी आशा आहे.

---

**पत्रांक १०३** **॥ श्री ॥** (?)

शके १७१३ १७९१ इ

**मेहरबान राजा** ( ) यास—आपल्या भेटीच्या अपेक्षेचे वर्णन कोठवर करू ? परतु प्रत्येक गोष्ट कालावर अवलंबून आहे आज ता ९ शाबान रोजी मी तुंग-भद्रा नदीकाठी कर्नूल येथे दोन कोस अंतरावर सुखरूप असून चिरंजीव **लछमन-रावास** बड्या बड्या सरदाराबरोबर व विजयी फौजेबरोबर आपलेकडे पाठविले आहे

सदर चिरंजीव गर्जीकोस्याच्या मार्गानें तिकडे येतील. आपण पुढे येऊन त्यांस मिळून एक विचार लॉर्ड कॉर्नवॉलिसच्या फौजेस मिळावें कदाचित् चिरंजिवाच्या पोहोचण्यापूर्वीच आपली व लॉर्डाची गाठ पडली तर आपण चिरंजीवास एकविचारें दोघांनीहि येऊन मिळावें. व आपला कुशलवार्ता व पत्ता चिरंजिवास कळवावा म्हणजे तो तेथ येईल हमेशा कुशलवार्ता व कामकाज लिहीत जावें कारण मी आपणास माझें समजत आहें.

---

पत्रांक १०४ ॥ श्री ॥ ( अर्काटचा नबाब )

शके १७१३ १७९१ इ

**मेहरबान रावसाहेब ( प्रधान ) यांस**— विशेष- आमच्या चार पिढ्यापासून व आपल्या चार पिढ्यापासून परस्पर चालत आलेला व आपल्या व माझ्या दरम्यान असलेला स्नेहसंबंध जो आहे तो अनिर्वर्णनीय आहे परंतु वस्तुस्थिति अशी आहे का, प्रसंग पडला असता मदत करण्याच्या वेळी तो स्नेहसंबंध कसोटीस लावतो आपण वर लिहिलेप्रमाणे कसोटीस उतराल असा मला पक्का भरवसा आहे. बरकड गोष्टी **जनार्दनराव** हे आपल्या सेवेसी जाहिर करतील कारण, ज्याचा पाया अशाश्वत आहे अशा या कारखान्यात म्हणजे जगात प्रेम व स्नेह याशिवाय कोणतीहि गोष्ट जगरूपी दफ्तरात कायम राहणारी व स्मरण करणारी अशी नाही. प्रेम व स्नेहरूपी बागेस बहारवृद्धि जशी अवश्य आहे त्याप्रमाणें आपण रावमजकूर याच्या सांगण्यावरून आमच्यावर मेहेरबानी करावी हें योग्य आहे दोस्ताचे हक्क सभाळणे व त्यास मदत करणें, सत्य पाळणें इत्यादि गोष्टी आपल्या नजरेसमोर रहाणे न्यायास अनुसरून आहे विलायतच्या अंग्रेजी राज्यात **लार्ड कार्नवालिस** हे एक फार मोठे दर्ज्याचे आहेत. ते स्वाभाविक शहाणे आहेत, सर्वगुणसंपन्न आहेत. इकडील कामाची व्यवस्था लावण्यासारखे आहेत, दोन्ही सरकारांच्या दोस्तीचा पाया मजबूत करणारे दक्ष आहेत. शपथेवर सांगतों की, पुष्कळ दिवसापासून दोस्ताची अशी अपेक्षा होती की, ईश्वरकृपेनें साधन इष्ट वस्तु प्राप्त झाली आहे. यास आपणहि एक ईश्वरी देणगीच समजावें, कारण, पुष्कळ गोष्टीचा यात–निर्गम–होणार आहे.

---

पत्रांक १०५ ॥ श्री ॥ जे. कनवे.

शके १७१४ चैत्र शु० ५ रा। ३०।३।१७९२ इ,

**मे० हरीपंडत फडके यांस**—विशेष, मनातील भावना लेखणीच्या जिभेतून उतरवून दाखविणें फार कठीण कर्म आहे. म्हणून लेखणीरूपी घोड्याचा लगाम या ( कागदरूपी ) मैदानावर रोखून धरून फक्त मुद्यापुरतेच लिहीत आहे यापूर्वी

**मदारुल् महाम**कडून सामोरें जाण्याबद्दल ताकीद आपणास दिलेली असल्याबद्दल मिस्तर **मालेट साहेब** याजकडून हमेषा पत्रें येतात, त्यातून समजलें त्यांच्या आज्ञेप्रमाणे प्रथम भेटण्याकरितां आपण तावडतोब **बंदगान अल्ली**च्या मोगला फौजेशी मिळून सामोरें जाल अशी आशा आहे. परंतु, मिस्टर **इष्टुअर्ट** साहेबांच्या पत्रावरून समजतें कीं, मोगला फौज रायचुरीमध्यें खोळाबून थांबली आहे असें दिसतें **लॉर्ड कॉर्नवॉलिस्** याचे पत्र ता. २५ माहे रजबचें आले त्यात **कंपनी**ची फौज मोगला फौजेशी मिळण्याकरिता बंगलोराहून गुरमकोंड्याकडे गेल्याचें लिहिलें आहे तीं त्याप्रमाणें मिळेलच आपल्या खुषीचे सविस्तर पत्र वरचेवर पाठवून आनंदवीत जावे, कारण, तीच खबर तशी गव्हर्नर जनरल बहादूर याजकडे आम्हास कळविणें आहे. बहुत काय !

जे कनवे.

---

**पत्रांक १०६** || श्री || **कॉर्नवॉलिस**

शके १७१४ श्रावण आगष्ट १७९२ इ.

**मेहरबान नानासाहेब** यास—आमच्या स्नेहाची व दोस्तीचा अमर्यादित अपेक्षा दाखविणारें आपले पत्र पावलें आपण आमची कुशल वार्ता विचारली आहे याचें कारण आपल्या स्नेहाळ अंत:करणात आमच्याविषयी अत्यंत प्रेम व स्नेह आहे हेंच होय. असो. विलायतच्या **बादशहाने**—ईश्वर त्याचे राज्य व देश चिरायु ठेवो — मला किताब दिल्याबद्दल खबर आपणास समजून फार आनंद झाल्या बद्दल व इतरहि आपल्या अनेक चांगलपणाच्या हकीकती मेहरबान **सर चार्लस मालेटसाहेब** याच्या पत्रावरून उत्तम वेळी समजल्या. आपण या ( आमच्या ) राज्याचे जुने दोस्त व माझे खरे प्रेमी स्नेही आहांत त्यामुळें आपणास ही आनंदाची खबर ऐकून फारच आनंद झाला असेल अशी मला खात्री आहे तो ईश्वर आपल्या सर्व स्नेह्यांस असाच आनंद देवो. या प्रमाणेंच आपण वरचेवर कुशल-पत्र पाठवून प्रत्येक बाबतीत मी आपला एक हितचिंतक आहे हें जाणून मला आनंदवीत जाल अशी आशा आहे बहुत काय लिहावें !

**कॉर्नवॉलिस्**

---

**पत्रांक १०७** || श्री || **कॉर्नवॉलिस**

शके १७१५ अधिक वैशाख व० २ ता० २८।४।१७९३ इ.

**श्रीमंत रावसाहेब** याचे सेवेसी—आपले पत्र **सर जॉन शोअर** साहेबांचे नांवें कलकत्त्यास मी येण्यापूर्वी **लाला गुलाबराय** याची नेमणूक त्याच्या मयत बापाच्या जागेवर केली असल्याबद्दल मजकुराचे—आलेले वाचून फार आनंद झाला।

**लाला** मजकूर हा फार हुशार व सद्गुणी असल्यामुळे त्याची या जागेवरील नेमणूक अगदी योग्य व उत्तम केलली आहे हें पाहून माझ्या अंतःकरणास अत्यंत समाधान वाटलें त्या सरकारानीही आपल्याशी असलेल्या दोस्तीस व स्नेहास अनुसरून सदरहु **लाला** यांचा योग्य तो मानमरातब ठेविला म्हणूनहि यानी आपणास या सर्व गोष्टी कळवून त्यामुळे आपणास हि आनंद झाला असेलच अशी मला खात्री आहे. आपण आपले कुशलपत्र स्नेह्यास पाठवून वरचेवर पत्रद्वारें स्नेह वाढवून आनंदवीत जाल अशी आशा आहे. कळावें बहुत काय लिहिणे ?

कॉर्नवॉलिस्

---

**पत्रांक १०८** ॥ श्री ॥ **कॉर्नवॉलिस्**

शके १७१५ अधिक वै० व० २ पा। २८।४।१७९३ इ

**श्रीमंत माधवराव नारायण पंडत प्रधान** यास–विशेष, आपल्या शुभलग्नाची उत्तम वार्ता ऐकण्याची मनापासून उत्कंठा असता त्या समारंभाची खबर समजून इतका आनंद झाला आहे की तो या पत्री लिहिता पुरवत नाही. सदर लग्न घडून आल्यानें जवळच्या व दूरच्या सर्व हितचिंतक स्नेह्यास व विशेषतः आपणास ईश्वर सुखी करो, व त्याची गोड फळें परमेश्वर आपणास देवो मी विशेष आनंदाने आपले अभिनंदन करीत आहे आपणास दीर्घायुष्य, वैभव वगैरे देण्याबद्दल ईश्वरास मी प्रार्थना करीत आहे. बहुत काय लिहिणे ?

कॉर्नवॉलिस्

---

**पत्रांक १०९** ॥ श्री ॥ **कॉर्नवॉलीस्**

शके १७१५ वैशाख शु० ३ पा। १३।५।१७९३ इ

**मे० नाना फडणवीस** यासः—

परस्पर एकीचा व स्नेहाचा असलेला दृढ संबंध, खरेपणाने व वचनाप्रमाणे पाळल्यामुळे व परस्पर कामकाज भरभराटीने पार पाडल्यामुळे, दिवसेंदिवस दुप्पट वृद्धिंगत झालेला आहे असे आहे तथापि परस्पर विश्वासामुळें कोणताहि आडपडदा न ठेविता उघडपणें परस्पर खरेपणानें वागून कामात गुह्य गोष्टी समजाविण्याचा कधी कधी प्रसंग पडतो. ईश्वरानें घडवून आणलेला आपला परस्पर संबंध पूर्वीपेक्षा अधिक मजबूत होऊन तो जगाच्या स्तुतीस पात्र होईल. मी वरील सर्व गोष्टी मनांत उत्तमप्रकारें समजुन व इंग्रजसरकारचे एक हितचिंतक मित्र असे आपणास समजून ज्यात इंग्रजलोकाचा संबंध आहे अशा हरएक गोष्टीची खबर आपणास देणे, हें परस्पर शुद्ध भावास अनुसरून करण्याच्या अनेक गोष्टीपैकी एक आहे असे

मी समजतों. या एकदर परिस्थितीप्रमाणें ज्याप्रमाणे हिंदुस्थानात अशक्य वाटणारी अशी शांतता व सौख्य येथील लोक अनुभवीत आहेत त्याप्रमाणें विलायतेंतहि शांतता व सौख्य नांदत आहे. आणि म्हणून ही गोष्ट आपणास जाहीर न करणें हें मित्रत्वास व निष्कपटपणास अनुसरून होणार नाही असें जाणून व दोस्तीचे व एकीचें हें एक कर्तव्य मानून परस्पर भेदभाव मनात न आणतां मुख्य विषयाकडे मी वळतों. आपणापासून पुढील गोष्ट छपून न रहावी ती अशी–इंग्रज लोक व फ्रेंच लोक यामध्यें परस्पराच्या भरभराटीस कारणीभूत असलेल्या स्नेहास अनुसरून दोन्हीकडील थोर थोर सरदार काही वर्षांपासून परस्पर वागत आले आहेत. अलीकडे तीन चार वर्षें झाली असतील तेव्हांपासून फ्रान्स देशातील हलक्या प्रतीचे रहिवाशांनी ज्याचा धंदा नेहमी आगलावेपणाचा आहे त्यांच्या व जुलुमी लोकाच्या चिथावणीवरून धामधूम करण्याचे डोक्यात येऊन आपल्या देशांतील सरकारी कायदे मोडले, जे प्रत्येक देशात राज्याचे खांब समजले जातात अशा थोर थोर सरदारास व स्त्रियास बाहेर टाकून दिले, व सैतानी उपदेशामुळें अनेक प्रकारचे उत्पात करण्याचें पाप त्यांनी संपादिलें त्यांनी आपला जुलमी हात बादशहाच्या मदतगार मंडळीच्या पदरापावेतों घातला व त्याचा अपमान केला. असेर त्यानी आपल्या जुलमाचे निशाण येथपावेतो उभारलें की, त्या दुर्दैवी जमावानें निर्भयपणे तरवारीच्या घावानें सदर बादशहाच्या अस्तित्वाचा उगा इहलोकापासून परलोकात ओढून नेला ( बादशहास ठार केले ) त्या मुलखात त्यानी कायदेकानूचें बंधन तोडलेलें आहे अशा स्थितीत शेकडों वर्षांपासून परदेशीय बादशाहा व सरदार यांच्याशी राजकारण करण्यात योग्य असे जे बुद्धिमान चतुर मंत्री व अधिकारी त्यासही नाहींसे केलें आपल्या स्वतःच्या देशात भयंकर अविचारी वर्तन ज्याअर्थी अमलांत आणलें आहे त्याअर्थी दुसऱ्या जातीच्याहि बाबतीत त्याच्या अंतःकरणात ते तसेच आणतील यात नवल तें काय! असो. अलीकडे विलायतच्या वर्तमानपत्रावरून असें ऐकण्यात येतें की, त्या बडखोर टोळीने आपल्या देशात अत्यंत अव्यवस्था व तंटेबखेडे उपस्थित केलेले आहेत. इतकेंच नव्हे तर, लढाईची व मारामारीची आग विलायतच्या मोठमोठ्या सरदारासहि त्यानी नेऊन पोहोंचविली आहे. बरीच वर्षें अव्यवस्था झाल्यामुळे अवश्य खर्चाचे रकमेस तूट व बाध आला व त्यामुळे दर्यायी व खुष्की फौजा खर्चास न मिळाल्यामुळें हुकमतीत रहाणें जवळ जवळ अशक्य आहे. असे आहे तथापि त्यांनी इतर सरदाराप्रमाणें इंग्रज लोकावरहि मगरूरीचें व दांडगाईचें निशाण उभारलें आहे मात्र इंग्रज लोक सर्व लहान थोर मंडळींशी ज्या सरळपणाने व मित्रत्वानें पुष्कळ दिवसांपासून वागत आले त्याचप्रमाणें वर्तन ठेविलेले आहे. शिवाय केवळ निष्कारण अशा प्रकारचे सदर जमावाचे आम-

त्याशी वर्तन घडतें तर तें कोण सहन करू शकेल ? सबब, या कृत्यांचे निराकरणार्थ व्यवस्था लावणे जरूर जाणून या चळवळीच्या मूळ उत्पादकांस शिक्षा करण्याकरिता विलायतेंत व हिंदुस्थानांत हि तजवीज केलेली आहे. व मी ही खबर विलायतच्या वर्तमानपत्रावरून समजून बगाल्यातील त्याच्या ( फ्रेंचाच्या ) ताब्यांत असलेली बंदरें व वखारी आपल्या ताब्यांत घेतल्या आहेत. ईश्वरकृपेनें पुन्हा एखादे वेळेस या दुष्ट चळवळ्यांना हिंदुस्थान व दक्षिण यामध्यें व आसपासच्या प्रदेशांत असलेल्या शांततेचा भग करण्याची ताकद राहू नये अशा प्रकारची तजवीज करण्यांत येईल. मला आपण सर्वथैव आपला एक हितचिंतक जाणून हमेशा कुशलवार्ता लिहून खुषी करीत जाल अशी आशा आहे. बहुत काय लिहावें ?

कॉर्नवॉलिस्

---

**पत्रांक ११०** ॥ श्री ॥ **कॉर्नवॉलिस्**

**शके १७१५ ज्येष्ठ व० १०** पा। ३।७।१७९३ इ.

**श्री० रावसाहेब यांचे** सेवेसी.—देशप्रेमामुळे मी कांही महिन्यापूर्वी विलायतेस जाण्याचें निश्चित ठरविलें त्याप्रमाणे मी विलायतेस गेल्यावर येथें कंपनीच्या जागेवर कोणी तरी नेमून मला रजा मिळावी म्हणून मी विलायतेस विनंति केली व तिकडून आलेल्या पत्रांवरून पहाता ती मंजूर झाल्याचें समजते. प्रथम बंगाल कौन्सिलमध्यें सरकारी कामावर नेमलेले **सर जॉन शोअर** याची नेमणूक गव्हर्नर जनरलच्या जागेवर माझ्या सूचनेप्रमाणें झाली. साहेबमजकूर हे कलकत्त्यास हल्लीं आलेले आहेतच. परंतु विलायतेस जाण्याकरितां वारा अनुकूल नाही म्हणून मी ४।५ महिने येथें अडकून पडलों आहे. सदर मुदतींत **सर जॉन शोअर** साहेबांस आपणांसंबधी स्नेहाच्या वगैरे सर्व गोष्टी सांगून ठेवीत आहे सदर साहेब हे येथें असल्यामुळे परस्पर सरकारामधील दोस्तीबद्दल त्यांस पूर्ण माहिती असल्यामुळें त्यास फारच आनंद झाला व ज्याप्रमाणें मी आपणाशी समभावानें वागलों त्याप्रमाणें वागण्याची त्यांची उत्कट इच्छा आहे. तथापि आपल्याविषयी असलेल्या स्नेहामुळें व प्रेमामुळें इतकें लिहिणें जरूर आहे की, मी विलायतेस गेल्यावर हलीचे नेमलेले गव्हर्नर जनरल **सर जॉन शोअर** हे आपल्याशी स्नेहानें व प्रेमानें वागतील, **सर जॉन शोअर** यांजसंबधी ज्यांत मजकूर आहे असे हें पत्र पाहून आपणांस आनंद होईल म्हणून मुद्दाम हें पत्र पाठवीत आहे. निघेपर्यंत मी आपल्या आहे त्या अधिकारावर राहीनच. तरी आपण मला आपला एक हितचिंतक समजून पूर्वीप्रमाणें कृपापत्र पाठवून आनंदवीत जाल अशी आशा आहे फार काय लिहिणें ?

कॉर्नवॉलिस्.

---

पत्रांक १११ ॥ श्री ॥ पी. एस्.

शके १७१५ श्रावण शु० ६ नतर १३।८।१७९३ इ. नतर

*रावसाहेब बाळाजीपंडत ( फडणवीस ) यास-- विशेष--चिनापटणाकडील कामकाजाबद्दल व्यवस्था लावण्याकरितां तेथें जाण्याचा नबाब गव्हर्नर जनरल यांचा इरादा असल्याबद्दल सविस्तर मजकूर त्याच्या पत्रावरून आपणांस समजला असेलच. त्याप्रमाणे नबाबसाहेब मौसुफ हे ता० १३ माहे आगष्ट सन चालू रोजी कलकत्त्यास रवाना झाले. विलायतेस जाण्याच्या मुदतींत या सरकारचा चिनापटणकडील कामकारभार मी व इतर कौंसिलदारसाहेब यांजकडे सोपविला आहे. हा मजकूर आपणास कळविणें जरूर समजून मुद्दाम पत्रीं लिहीत आहे. इंग्रज कंपनी व आपण या दोघामधील परस्पर दृढ असलेल्या दोस्तीस व एकीस अनुसरून दोस्तीचा पाया दृढ करणारी कुशलपत्रे लिहून मला खुष कराल अशी आशा आहे. बहुत काय लिहिणें ?

पी. एस्.

---

पत्राक ११२ ॥ श्री ॥ कॉर्नवॉलिस्

शके १७१५ भाद्र० शु० १२ ता १७।९।१७९३ इ.

या पूर्वी चिनापट्टणकडील कामकाजाचा उलगडा करण्याकरितां माझे जाणें लांबलें आहे व त्यानंतर जहाज निघण्याचे वेळी विलायतेस जाण्याचा माझा इरादा असल्याबद्दल वगैरे तपसीलवार मजकूर स्नेहपूर्वक लिहून आपणास कळविला तो समजला असेलच अशी मला खात्री वाटते. हल्ली ईश्वरकृपेनें व स्नेह्यांच्या सुदैवानें माझ्या सर्व कामांतून मी मोकळा झालों आहे. व विलायतेकडे जहाज हाकण्यास अनुकूल व मनाजोगा वारा झाला आहे. मी ( आपला स्नेही ) चिनापट्टण मुकामी जहाजावर बसून विलायतेकडे रवाना झालों. याउपर सर जॉन शोअर साहेब बहादर माझ्या मागें गव्हर्नर जनरलच्या अधिकारावर नेमलेले आहेत ज्याप्रमाणें आपण माझ्याशी एकीचा व दोस्तीचा पत्रव्यवहार करीत होता त्याच प्रमाणें त्यांच्याशीहि पुढें सुरू ठेवाल अशी आशा आहे. आनरेबल साहेबहि दोस्तीखातर व दोस्तीस व एकीस अनुसरून माझ्यापेक्षांहि अधिक आपणाशी वागतील अशी खात्री आहे. बहुत काय लिहिणे ?

कॉर्नवॉलिस्

---

* याच मजकुराचे दुसरे एक पत्र सखारामबापूंच्या नांवचे आहे.

**पत्रांक ११३** **॥ श्री ॥** **कॉर्नवॉलिस्**

शके १७१५ आश्विन व० १२ पा। ३१।१०।१७९३ इ.

**मे० पेशवा सवाई माधवराव** यास— विशेष— आपल्या शुभ विवाहाची खबर समजून आपले अभिनंदन केव्हां करता येईल अशी माझें मन अपेक्षा करीत असतांना **सर चार्लस् मालेट्** याचेकडील आलेल्या पत्रांतील आपल्या विवाहाच्या शुभवार्तेचा मजकूर वाचून मला इतकी खुषी वाटली कीं, तिचें वर्णन या अशा संक्षिप्त पत्रांत मावू शकणार नाही. या विवाहाच्या योगाने ईश्वर विशेषतः आपणास व आपल्या जवळदूरच्या मित्रास भरभराट व चांगुलपणाचें फळ देवो. मी मोठ्या उल्हासानें आपलें अभिनंदन करीत आहे. आपल्या दीर्घ आयुष्याकरिता व वैभवाकरितां ईश्वरास प्रार्थना करीत आहे. बहुत काय लिहिणे?

कॉर्नवॉलिस्

---

**पत्रांक ११४** **॥ श्री ॥** **शोअर**

शके १७१५ पौष व० १३ पा। २९।१।१७९४ इ

**श्रीमंत पेशवेसाहेब यांस**—आपणा परम्परांतील दोस्ती व स्नेह झालेला आहेच व आपलें परस्पराचे कामकारभार एकच आहे. या बाबतीत स्नेहपूर्वक लिहीत आहे. परस्पराचे हक्क न्यायनीति व स्नेह हे सर्व **कंपनी इग्रज बहादर** याच्या डोळ्यापुढे सतत आहेत **नबाब +सादतअलीखान बहादर** हे कंपनीसरकारच्या मदतीनें गादीवर बसले गादीवर तेच वारस आहेत. सर्व लहान मोठ्या लोकानी त्यास मान्य केले आहे व हें तट्याबखेड्यावाचून घडून आले ही फार आनंदाची गोष्ट आहे. असो. स्नेह्यास वरचेवर पत्र पाठवीत जाऊन कुशल कळवून संतोषवाल अशी आशा आहे. कळावे बहुत काय लिहिणे।

जे. शोअर

---

**पत्रांक ११५** **॥ श्री ॥** **( चिनापटण )**

शके १७१६ भाद्र० शु० १४ रा। ८।९।१७९४ इ.

**श्रीमंत सवाई माधवराव नारायण पंडित प्रधान** यास— विशेष— ग्रेटब्रिटनचे **बादशाहा** याच्या हुकमावरून प्रधान कारभारी वगैरे यानी मला येथील कारभारावर नेमल्यावरून मी येथे चिनापटणास पोहोंचून सूत्रे हाती घेतली आहेत. सबब आपणास लागलीच कळवीत आहे. आपणा परस्पर सरकारात असलेला दृढ

---

\+ लखनौचे.

स्नेहसंबंध व एकीरूपी बाग नेहेमी हिरवागार व टवटवीत आहे असे पाहून मला फार आनंद होत आहे व यासंबधी प्रत्येक भलेपणाचें काम आपण सांगाल ते करण्यास मी तत्पर राहीन. बहुत काय लिहिणे ?

---

**पत्रांक ११६.** ॥ श्री ॥ **सर जॉन शोअर.**

शके १७१६ माघ० व० ३० पा. १९।२।१७९५ इ.

**बाळाजी पंडित** यास– विशेष—

प्रत्येक शब्दांत श्रीमत **पेशवे** सरकार व **नवाब आसिफजाहा** बहादर व सरकार **कंपनी** अंगरेज बहादर यामध्ये परस्परांत दोस्तीमुळें पराकाष्टेचे एक मत होतें व **टिपु-सुलतान** च्या मोहिमेमध्ये हि तिघानीहि फार श्रमपूर्वक फायदा करून घेतला, ही पूर्वीची स्थिति मला चांगली आठवते. हल्ली **पेशवेसाहेब** व **नबाबसाहेब** यांमध्ये शक्य तितके प्रयत्न मने साफ करण्याकरिता केले तरी मुद्दां परस्परांत वैर दिसून येत आहे, त्यामुळे माझ्या अंतःकरणास फार खेद होत आहे या एकीच्या बाबतींत तिघां सरकारांत ती पूर्वीप्रमाणेंच कायम असणें हा तिघासी एक मोठा कायमचा आधार होईल व ( त्यामुळें ) हिंदुस्थान देशात हि शांतता राहील. यांत अडथळा आणणारी गोष्ट केव्हांहि घडणार नाही. एहतेशामुदौला **सर चार्लस वार मालेट** बहादर याजकडून या सर्व गोष्टी तपसीलवार आपणास ( **बाळाजी पंडित** यास ) व पेशवे सरकारास जाहीर जाल्यास बरेच दिवस झाले आहेत जो तंटा **पेशव्यांच्या व नबाबाच्या** नुकसानीला कारणीभूत होतो तो तोडून फायदा करण्याकरितां व उभय सरकारामध्यें मनें साफ करण्याकरिता मी हरएक प्रकारें परिश्रम व प्रयत्न केलेले आहेत त्यात कोणतेहि प्रकारें कसूर केलेली नाही एवढें मला समाधान वाटतें. दोन्ही सरकाराचा जो कोणी दोस्त असेल ( मग तो कोणी हि असो. ) त्यानें याच-प्रमाणें करणें प्राप्त होतें. याशिवाय, तीन्ही सरकारामधील स्नेह पुष्कळ दिवसापासून वृद्धिंगत होऊन कायम झालेला असल्यामुळें **कंपनी** सरकारचाहि नफा आहे ही गोष्टहि माझ्या स्नेहपूर्ण अंतःकरणांत वागत आहे. त्यानंतर माझे सर्व प्रयत्न निष्फळ झाले व महाराजसाहेब व **नवाबसाहेब** याच्या मधील बिघाडाचें मूळ कारण सम-जलं नाही. व ज्या स्नेहाचा उपयोग व परिणाम परस्पराचा उलगडा करण्यात झाला असता त्या स्नेहास अनुसरून सलूखाकरिता शक्य ते प्रयत्न केले तरी ती गोष्ट घडून येत नाही हें सर्व पाहून माझ्या स्नेहपूर्व अंतःकरणास अत्यंत खेद होत आहे अखेर या सर्व गोष्टीमुळे दोन्ही सरकारातील बिघाडाची अत्यंत वाईट गोष्ट पाहून–अशी गोष्ट केव्हाहि न घडो अशी मी पूर्ण आशा करितों. तिन्ही सरकारामधलि पूर्ण दोस्तीमुळे मला समजत असलेल्या व माझ्या अंतःकरणातील, गोष्टी तांबडतोब वेळ न गमावता लिहून कळविण्यात गुंतलो आहे. वरकड गोष्टी साहेब मजकुराच्या ( = **मालेट**

साहेबांच्या ) जबानी वरून आपणांस व महाराजसाहेब यांस जाहिर होतील. आपण मला एक हितचिंतक जाणून कुशल पत्र पाठवून खुषी कराल अशी आशा आहे. फार काय लिहिणें ?

जे. शोअर

---

पत्रांक ११७ ॥ श्री ॥ शोअर

शके १७१७ श्रावण शु. ८ ता २४।७।१७९५ इ.

**श्रीमंत माधवराव नारायण पंडित प्रधान** यास—विशेष. इकडून लढाईची हकीकत व दरम्यान तहासबंधी मजकूर लिहून पाठविलेले पत्राचे उत्तरी आपले कडून कृपापत्र, असे प्रकार उत्तर येईल अशी खात्री वाटत नसताना, उत्तम समयी आलें ते पोहोचून फारच समाधान वाटलें. व सर्व मजकूर तपशीलवार समजला. आपण व **नवाब आसफजहा** याजमध्यें परस्पर बेबनाव व झगडा असल्याबद्दल समजून फार काळजी लागली होती. परतु ती आता आपली परस्पर दोस्ती झाली आहे हें कळून आमच्या सरकारची आपणा दोघां सरकाराशी अत्यंत स्नेह व एकी असल्यामुळे, दूर होऊन अत्यत आनंद झाला. ईश्वरी योगानें घडून आलेले परस्पर दोस्ती व एकीचे फायदे हे दोघांचे मनास पूर्णपणे समजले. आता परस्पर स्नेह व एकीचे जें स्वरूप आहे तें ईश्वरी कृपेनें शाश्वत टिकावें ही आशा फार आहे. आपला आरोग्याचा एक हितचिंतक समजून नेहमी कृपापत्र पाठवून खुष करीत जाल अशी आशा आहे. बहुत काय लिहिणें ?

जे. शोअर

---

पत्रांक ११८ ॥ श्री ॥ डॅनिअल् सीटन्

शके १७१८ मार्ग. शु० ५ नतर ४।१२।१७९६ नंतर

**श्रीमंत पंडत प्रधानसाहेब** यास— **डॅनियल् सीटन** यांजकडून विशेष— आपले कृपापत्र पोहोंचून परमानंद वाटला. व त्यातील महाराजाकडून आपणास **पेशवाईची वस्त्रें** मिळाल्याबद्दल आनंदकारक मजकूर ऐकून जवळ-दूरच्या मित्रास अत्यत सुख झाले. ईश्वर आपणास यशस्वी सुदैवी व वैभवी, सुखी व सिंहासनाचा अलकार, पृथ्वी आहे तोंपावेतों करून सर्व इष्टसिद्धि करो. व त्याबद्दल त्याच्या दरबारी त्याचे आभार मानतो. तो अत्यत श्रेष्ठ ईश्वर आपल्या विश्वौदार्यानें आपणांस सुखी राखो. हितचिंतकाचे आभार व आशीर्वाद हे मगळाचें द्योतक आहे. ईश्वरकृपेनें आपण व इंग्रजकंपनी सरकार यांमधील दोस्तीचा सबंध कायम मजबूत होवो अशी प्रार्थना आहे. माझ्याकडून होण्याजोगें काम करण्या-

बद्दल आपण सूचनाज्ञा कराल तर तें मी करण्यास खुषी आहे. बहुत काय लिहिणें. ईश्वर आपणांस सुखी राखो.

डी. सीटन्

---

**पत्रांक ११९** ॥ श्री ॥ **चेरी**

शके १७१८ पौषानंतर डिसेंबर १७९६ नंतर

**महाराजासाहेब** यास— विशेष– आपलें स्नेहपत्र उत्तम समयी पावलें. त्यातील प्रत्येक अक्षर व शब्द यात स्नेहाचा सुगध होता. त्यामुळें प्राण व प्रेम या जुळ्याच्या मगजांत घमघमाट झाला. आमचे मन अत्यत सुप्रसन्न असताना गादी-नशीन झाल्याबद्दलची शुभवार्ता त्यात असलेली समजली ज्या लोकानी आपणास गादीवर बसण्याच्या कामी अडथळा केला त्यांस यथायोग्य शासन झाले आहे. व आपण आनंदानें यशस्वीपणाने पुण्यास दाखल झाला. **राव बाळाजी जनार्दन** हे कोंकणातून येऊन त्यास आपल्या भेटीचा लाभ झाला य प्रमाणें आपणा दोघाची युति झाल्यावर **अबासाहेब बहादर** व तमाम सरदार यास श्रीमंत हुजूर महाराजा-साहेब यानी वस्त्रें दिली. याप्रमाणेहि मजकूर त्यात होता या वार्तेमुळें जवळदूरच्या स्नेह्यांस व मला अत्यत आनद झाला. सदर सुदैवी पत्राचें अभिनदन प्रत्यक्ष लक्ष्मीनेंच आनदानें केलें या शुभवार्तेनें माझा अंतःकरणरूपी प्याला आनंदरूपी दारूनें इतका भरून गेला की त्याचे किंचित् वर्णन करीन म्हटले तर दफ्तरें लाग-तील–या गोष्टीस एक ईश्वर साक्ष आहे. या ईश्वरदत्त राज्यारोहणामुळें जवळदूरच्या अभीष्टचिंतकास व विशेषतः आपणास ईश्वर नेहेमी सुखी करो आपण सरकार व **कंपनी**सरकार या परस्परातील स्नेह, प्रेम व एकी नेहेमी मजबूत व कायम आहेच. व यामुळेच नवाब गव्हर्नर जनरल **सर जॉन शोअर बारोनेट**साहेब बहादर यानींहि आपणास कलकत्त्याहून पत्र पाठविले असेलच. त्यावरून परस्पर स्नेहरीति व वागणूक ही लक्ष्यात येईलच. याच गोष्टीकडे मीहि नजर देऊन आपल्या अखंड वैभवाबद्दल व चिरायुष्याबद्दल शुद्ध अन्तःकरणानें ईश्वराजवळ प्रार्थना करीत आहे. मला आपला एक हितचिंतक नेहेमी समजून वरचेवर याचप्रमाणें कुशलपत्रें पाठवून आभारी करावें. नेहेमी सुखाचे दिवस असोत.

जी. एफ्. चेरी.

---

**पत्रांक १२०** ॥ श्री ॥ ( ? )

शके १७१९ चैत्र. एप्रिल १७९७ इ.

**श्री. महाराजासाहेब** (1) यांस —विशेष —आपलें कृपापत्र मेहेर-

बानीने पोंहचून बहुमान झाला. आपल्या कृपेच्या अनेक गोष्टी **लाला आनंदराम** याच्या जबानीवरून समजल्या. **लाला** मशारनिले हे इग्रजाच्या थोर साहेबाशी व जनाबे अली **वजीरुल् मुमालिक** याच्याशी भेटून परत आपल्या शेवेसी येतील. महाराज, आपल्या कृपेमुळें मी आभारी का न व्हावें ? **लाला मजकूर** हे तोंडी कळवितील. हमेशा पत्र पाठवून मला मान देऊन खूष कराल अशी उमेद आहे, नेहेमी सुखाचा काल व इष्टसिद्धि असो.

---

**पत्रांक १२१** ॥ श्री ॥ **सर जॉन शोअर**
शके १७१९ वैशाख शु० ५ रा। १।५।१७९७ इ.

**श्रीमंत पेशवे साहेब** यांस—विशेष—अत्युच्च थोर कुलोन महाराजांचा ऐश्वर्य—समृद्धि—महत्व—वैभवरूपी बाग कालवायूच्या अपघातापासून सुरक्षित राहून नेहेमी हिरवागार, टवटवीत, विकासी व मनोहर राहो. मी ( आपला अकृत्रिम स्नेही ) **नवाबसाहेब वजीरुल् मुमालिक** यांस भेटण्याकरिता लखनौस नुकताच गेलो होतों. एकमेकाच्या सहवासात माझे काही दिवस आनदात गेले. तेथून निघून मी कलकत्ता मुक्कामी ता० १ माहे मे सन चालू मुताबिक ता० ३ माहे जिल्काद् सुखरूपपणें परत आलों. दुभाषी स्नेह्याची नीति व मेहरबानी याची मला आठवण होते. म्हणूनच स्नेह्यांची कुशलवार्ता जाणण्याची फार इच्छा आहे. मला खरा स्नेही समजून वरचेवर कुशलपत्रें लिहून आनदवीत जाल अशी आशा आहे बहुत काय लिहिणें ?

जे. शोअर.

---

**पत्रांक १२२** ॥ श्री ॥ **सर जॉन शोअर**
शके १७१९ वैशाख शु० ६ रा। २।५।१७९७ इ.

*****श्रीमंत रावसाहेब महाराजांचा** अत्युच्च व थोर कुलीन-ऐश्वर्य-समृद्धि महत्त्व वैभवरूपी बाग कालवायूच्या योगाने सुरक्षित राहून नेहेमी हिरवागार, टवटवीत विकासी व मनोहर राहो. मी लखनौकडून प्रवासाहून परत कलकत्त्यास आलो तेव्हा आपलें कृपापत्र मिळाले. त्यात आपणांस पेशवाईची बहुमानाची वस्त्रें ता० ४ जमादिलाखर रोजी दिलीं गेल्याबद्दल वगैरे दोस्तीचा अत्यंत आनंदकारक मजकूर वाचून फारच समाधान वाटलें. यापूर्वी आपणांस मी अभिनंदनपत्र पाठविलें आहेच. आता पुन्हां अभिनंदन करतों व दोस्तीची व स्नेहाची वृद्धि होवो, अशी आशा करितों. याप्रमाणेंच आपली कुशलवार्ता वरचेवर कृपापत्रद्वारे कळवून मला संतोषवाल अशी मला आशा आहे. कळावे बहुत काय लिहिणें ?

जे. शोअर

---

* असेच दुसरें एक पत्र नाना फडणिसांचे व आहे.

**पत्रांक १२३** ॥ श्री ॥ **वेलस्ली**

शके १७२४ पौष वद्य १०. ता १८।१।१८०३ इ.

**श्रीमंत राव अमृतराव साहेब**—यास—विशेष—आपलें कृपापत्र पावले. त्यांतील मजकूर—**यशवंतराव होळकर** व **महाराजा शिंदे** याचे सरदार यामध्ये परस्पर वैमनस्य येऊन तटे सुरू झाल्याबद्दल व श्रीमंत महाराज **पंडत प्रधान** साहेब याची स्वारी किल्ले महाडकडे जाण्याबद्दल व आपण पुणे मुकामी येण्याबद्दल व इतर गोष्टीबद्दल—समजून फार आनंद वाटला. या गोष्टी आपण केवळ स्नेह व एकी यावर नजर देऊनच मला मुद्दाम कळविल्या आहेत. ईश्वरकृपेनें सरकार **अंगरेज** बहादर व सरकार **पंडित प्रधान** व आपले **सरदार** या परस्परांत प्राचीनपासून मैत्री व एकीचा संबध चालत आला आहे. आपण व **सरदार** मंडळी यामध्यें जें सख्य आहे त्यामुळे अंतकरणास अशी आशा वाटते की, सदरहु सरदाराच्या ठिकाणी दोस्तीचा पाया विशेषच भक्कम होवो. आपले थोर वैकुंठवासी वडिल श्रीमंत **रघुनाथराव साहेब** व इंग्रज सरकार यामध्यें असलेली कमालीची दोस्ती व त्याशी व आपणासी व आमच्या सरकारच्या लोकाशी परस्पर चांगलें वर्तन यावर नजर दिली असता आम्हांस अशी खात्री आहे की, त्याहिपेक्षा आपली दोस्ती व प्रेम जास्तच आमच्या हृदयावर कोरलेले आहे. **हिंदुस्थान व दखन या देशांतील सर्व रयतेस सुख व आराम मिळावें हें नेहमीं आमचे नजरेपुढें ध्येय आहे इंग्रजसरकार व नवाबसाहेब मीर निजाम अलीखान बहादर** यांची काजकामे एकरूपच असल्यामुळे सदर नवाबाच्या अंतःकरणात अशाच प्रकारची इच्छा प्रच्छन्न असली पाहिजे. सदर नवाब साहेबांच्या पत्रांवरून आपणास समजले असेलच. इंग्रजसरकारानी आपल्या व मराठे-सरकाराच्या सरदाराच्या कामकाजासंबंधी बोलणें चालणें करण्यास पूर्ण अधिकार दिलेले **कर्नल क्लोजसाहेब** हे आपल्या शेवेसी जाहीर करतील; त्या वरून वरील बाबतीत माझ्या मनातील विचार व गोष्टी समजून घेतील. मी आपला एक कुशलेच्छु समजून वरचेवर स्नेहाची कृपापत्रें पाठवून आनंदवीत जाल अशी आशा आहे. बहुत काय लिहावें ?

**वेलस्ली**

---

**पत्रांक १२४** ॥ श्री ॥ **लॉर्ड क्लीफ गव्हर्नर बंदर चिनापटण**

शके १७२५ आषाढ व० ६ ता १०।७।१८०३ इ.

**श्रीमंत बाजीराव रघुनाथ पंत प्रधान** यास—विशेष—आपलें कृपापत्र **नागोजीराव वकील** याजबरोबर येऊन पोहोंचलें व त्यामुळें फार आनंद

झाला. हिंदुस्थानांत आपला व इंग्रजसरकार यांचे परस्पर स्नेह व हितसंबंध इतके एकवटलेले आहेत की, ते एकरूपच दिसत आहेत. व आपल्या निर्मल अंतःकरणांतहि ते तसेच ठसलेले आहेत हें पाहून मला फार आनंद झाला. आपल्या मुलखांत असलेली शांतता कांहीं दिवस नाहींशी झाली होती ती आपण गादीवर आल्यामुळें पुन्हां प्रस्थापित झाली. व असाच हेतु आपणा दोघा सरकारांचा होता. आशा आहे की, ईश्वररुपेने हिंदुस्थानच्या रयतेस सुख असावें; हा हेतु इंग्रजाचा आहे व आपलाहि तो तसाच असावा. नागोजीरावास या कामावर आपण नेमिलें आहे ही फार समाधानाची गोष्ट आहे. व सदर वकिलाचा मानमरातब योग्य प्रकारें ठेवण्यांत आम्हांस आनंद वाटतो. वरचेवर पत्रें पाठवून कुशल कळवाल अशी आशा आहे. विशेष.

---

पत्रांक १२५ ॥ श्री ॥ लॉर्ड क्लीफ् गव्हर्नर
बंदर चिनापटण

शके १७२५ भाद्र. शु. १३ ता ३०।८।१८०३ इ.

**श्रीमंत पंडित प्रधान** यांस— विशेषः– ईश्वरकृपेनें मद्रास शहरी माझें येणें झाले. इंग्लिस्तानच्या थोर बादशहाच्या विचारपूर्वक हुकमावरून त्याच्या कारभारी व इतर थोर पदरच्या मंडळींनी मद्रासचा अधिकार माझ्याकडे सोंपविला आहे. व त्याप्रों सूत्र मी आपल्या हातात घेतलें आहे. सबब ही खबर मी आपणास लिहून कळवीत आहे. येथील जुना पत्रव्यवहार, कागदपत्रें वगैरे पाहून त्यातून आपली व कंपनीसरकारची उत्तम प्रकारची मैत्री पाहून इतर कामें सोडून प्रथम आपलेकडे पत्र पाठवीत आहे. आपला परस्पर स्नेहरूपी बाग नेहेमी ताजा टवटवीत व वृद्धिंगत राहील अशा कामांत मी नेहमी तत्पर राहीन याबद्दल आपण खात्री बाळगावी. आपण पत्ररूपी मेघाच्या वर्षावानें त्यास नेहमी विकासित, प्रफुल्ल कराल अशी मला उमेद आहे. बहुत काय लिहिणें ?

---

पत्रांक १२६ ॥ श्री ॥ सर जॉर्ज बार्लो.

शके १७२६ मार्ग. व० १३ नंतर २९।१२।१८०४ इ. नंतर

**बाजीराव पंडत प्रधान** यास— विशेष– पूर्वीपासून आपला परस्पर स्नेह आहे म्हणून मजकुराचें आपले कृपापत्र आलें तें पावलें. हल्लीं आपण व सरकार कंपनी इंग्रजबहादर याच्यामधील दोस्ती वाढत आहे. सबब मी आपल्या कुशलवर्तमानाची अपेक्षा नेहमी करीत आहे व आपणहि आमच्या कुशलतेची अपेक्षा तशीच करावी. याउपर विशेष. आपलेकडून हरी उधव वकिलीच्या कामावर आपण नेमलेले हे येथें आले आहेत. व ते आपले काम यथायोग्य करीत आहेत. हें ऐकून

आपणासहि आनंद वाटेलच. त्यांजमार्फत इतरहि स्नेहाच्या व एकीच्या अनेक गोष्टी आपण कळविल्या त्याहि सर्व पूर्णपणे समजल्या. आमच्या समक्ष भेटीत हरी उधव यानें तिकडील स्नेहाच्या वगैरे गोष्टी सांगून फार खुषी केलें. त्यांची एकदर चालचलणूक पाहून आम्हांस फार आनंद होत आहे. आपणा परस्पर सरकारामध्यें ईशकृपेनें घडून आलेला जो स्नेह त्यांत फरक न होता उलट वृद्धिंगतच होत जाईल व आमचीहि मेहरबानी त्यांजवर हमेशा राहील ही आपण खात्री बाळगावी. स्नेहास वरचेवर पत्र पाठवून कुशल कळवाल अशी आशा आहे कळावे बहुत काय लिहिणें ?

जी. एच्. बार्लो.

---

**पत्रांक १२७** ॥ श्री ॥ **ए. पी. करी**

शके १७६४ चैत्र शु० ३ ता १३।४।१८४२ इ

**महाराज साहेब** यास (?) विशेष—दर्शनापेक्षा दाखवुन कळवितों की, आपले कृपापत्र पावले, त्यातील प्रत्येक ओळींत कृपा व प्रेम भरलेले होते त्यातीलहि प्रत्येक अक्षर दोस्तीरूपी अत्तराने इतकें सुगधित होते की त्यामुळें मन सुवासित होत होते. मी आपल्या पत्राची उत्सुकतेने वाट पाहतच होतो, इतक्यात ते पोहोचले, त्याबद्दल मी आभारी आहे. आपली कुशलवार्ता न समजल्यामुळें मनास लागलेली काळजी तें आल्यामुळें दूर झाली व समाधान झालें. आपल्या गुणाचा एक चहाता समजून याचप्रमाणें प्रत्यक्ष भेट होईपर्यंत आठवण करण्याची कृपा व्हावी. बहुत काय लिहिणे. तारीख १३ माहे एप्रील सन १८४२ इसवी.

(सही) ए. पी. करी.

---

**पत्रांक १२८** ॥ श्री ॥ **टॉमसन्**

शके १७७६ १८५४ इ.

**मेहरबान** (?) **साहेब बहादर** यांस— विशेष— जरी मी सरकारी कामांत अतिशय गुतल्यामुळे आपल्या दरबारी बाह्यतः हजर रहातां आले नाही तथापि अतःकरणांतून मात्र दर क्षणास माझी जीभ आपल्या स्तुतिमुळें ओली होती. आपलें कृपापत्र न आल्यामुळें मन एकप्रकारें अस्वस्थ होते तो इतक्यांत आपलें पत्र ता ३० शाबान सन १२६८ हिजरीचे— 'आपण काशी पवाराचे हातें एक छडी पाठविली होती ती जुनी होती त्याच नमुन्याची दुसरी एक छडी आमचेकडे पाठवावी' या मजकुराचें उत्तम समई येऊन पोहोचलें. त्यामुळे मला हजारोपटीनें आनंद झाला व माझा मान आकाशापावेतों जाऊन भिडला. तो ईश्वर आपणास मोत्यात पाणी आहे तोंपावेतों व सूर्यात तेज आहे तो पावेतों सुरक्षित राखो व आपली इष्टसिद्धि करो. व यामुळे मला अभिमान वाटेल. आपण आज्ञा केल्याप्रमाणें छडी

लोकरच पाठविणार होतो परंतु पहिल्या छडीप्रमाणें छडी नव्हती. कारापूरांत वगैरे मी तपास केला पण मिळाली नाही. आता कलकत्त्याहून मागविली आहे काही दिवसांनी आल्याबरोबर आपणांकडे पाठवीन. आतां जवळ असलेली एक पाठविली आहे. स्वीकार होईलच. मला आपला एक हितचिंतक समजून आपले कुशल व माझ्याजोगें काम कळवून रुपा केल्यास मला अभिमानास्पद होईल.

अर्जी खैरतलब मिस्तर
टामसन—साहेब
**टामसन.**

---

**पत्रांक १२९** ॥ श्री ॥ (?)
शके (?) ता. (?)

मे० **पंडित साहेब** यास:—आपले कुशलपत्र पोहोचून फार आनंद झाला. बरोबरच्या **पाटकर** वगैरे मंडळीसह **भगवंतरावानी** जागा सोडून सालकढा (?) किल्ल्याचा आश्रय केला व गुमास्ते **हणमंतराव** हे **भगवंतरावास** सामील झाले. व नंतर **भगवंतराव** यांनी आपल्या फौजेसह व **एसाजी शिंदे कोल्हारवाला** यासह **भगवानराव गोविंदराव** व **पांडुरंगराव** व **रामचंद्र गणेश** यांजवर मौजे वडगांव येथे पारणा (?) नदीच्या काठी हल्ला करून तेथें लढाई झाल्याबद्दल व शत्रू बेता कदीमुळे पळून गेल्यामुळें कांही प्रांत प्रतापामुळें हाती आल्याबद्दल मजकूर समजला त्यामुळे स्नेह्यास फार आनंद झाला. जे काही होणें ते **श्रीमंत माधवराव नारायण** याच्या प्रतापाने होत आहे. वरकड, ठीक आहे. 'इंग्रजाचा वकील व आपण यामध्यें झालेला करारनामा अमलांत आणणे व वकील मजकुरानी कलकत्त्यास व मुंबई बंदराचे गव्हर्नरास पत्रें पाठविणे, तटेबखेडे मिटवून शांतता कायम करणें या बाबतीत आम्ही त्यास पत्र लिहिलेलें आहे. उत्तर आल्यावर आपणास कळवू' ही हकीकत समजली. पत्रोत्तरें आल्यावर वस्तुस्थिति मला कळवालच. वरकड गोष्टी आणखी पत्री कळवीन. सुखकाल व इष्टसिद्धि असो

---

**पत्रांक १३०** ॥ श्री ॥ **कॉर्नवॉलिस् ८**
शके १७०९ कार्तिक शु० ९ ता १८।११।१७८७ इ.

मे० **माधवराव नारायण पंडित प्रधान पेशवासाहेब** यांस— विशेष—विलायतेहून परत येऊन येथील सर्व गोष्टीचा अधिकार व मुखत्यारी घेतल्याबद्दल पत्र मी आपणांस लिहिले होते त्याचे उत्तरी आपले आनंददर्शक रुपापत्र आलें तें पावलें. आपण व इंग्रज बहादर यामधील दोस्ती व एकी पूर्वीपासून कायम चालत आलेली आहे. सबब मलाहि ती मजूर आहे व त्या योगानें दोस्तीचा

पाया दिवसेंदिवस भरभक्कमच होईल. आपण पत्राबरोबर **लाला सेवकराम** याचा मुलगा **लाला गुलाबराय** याजबरोबर सोबतच्या यादीप्रमाणें कांहीं जिनसा पाठविल्या त्याबद्दल मी फार आभारी आहे. आपल्या पत्रांतील मजकूर वाचून फार आभारी झालों. आमच्या राज्याशी आपला दोस्तीचा संबंध पुष्कळ दिवसांपासून चालत आलेला आहे व तो परस्पर एकरूप आहे. मलाहि तोच संबंध मनापासून राखला पाहिजे. ईश्वरकृपेनें परस्पर दोस्तीरूपी जो बाग आहे तो एकीरूपी पाण्यानें हमेशा हिरवागार व टवटवीत राहील. **लाला गुलाबराय** सुखरूपपणें कलकत्त्यास पोहोचले, व मला भेटले. व आपण पाठविलेल्या यादीप्रमाणें जिनसा त्यांनी मला दिल्या. मीहि स्नेहपूर्वक त्याचा स्वीकार केला. तें एक स्नेहाभिवृद्धीचें कारण घडलें. **नानासाहेब फडणवीस** यांच्या शुद्ध दोस्तीबद्दल वगैरे मजकूर मी आपणांस लिहिलेला आहेच. त्याशिवाय वरकड गोष्टीबद्दल **मिस्टर मॅलेटसाहेब** यांच्या पत्रावरून ते आपणांस जाहीर करतील. मला अशी खात्री आहे की, परस्पर दोस्तीच्या दृष्टानें आपल्याजवळ असलेले **मिस्टर मॅलेटसाहेब** हे आपल्या कामांत पूर्वीप्रमाणेंच वर्तन ठेवतील. हमेषा कृपापत्रें पाठवून आनंदवीत जावें. बहुत काय लिहावे ?

कॉर्नवॉलिस

---

**पत्रांक १२१** ॥ श्री ॥ **वलंद बताए जनरल**

शके १७१२ १७९० इ.

**रावसाहेब परशराम भाऊ** यांस—विशेष—हल्लीं टिपुसाहेबाशी जो आमचा तह होत आहे त्यात दर रुपयापैकी सहा आणे असा हिशेब ठरत आहे. परंतु इतर गोष्टी मात्र मनाप्रमाणे जुळत नाहीत. म्हणून कळवितों की, माझा पूर्ण हेतु असा आहे की, आपणां सर्व सरदारांशी एकदिल होऊन जो कांहीं मुलख वगैरे पदरांत पडेल त्याचा चवथा हिस्सा मला द्यावा व आपण बाकीचे तीन हिस्से आपणांमध्यें वाटून घ्यावेत. याच गोष्टीबद्दल आपली पत्रें आमच्याजवळ पूर्वीच आलेली आहेत व आमचीहि आपणाजवळ आहेत. वेळेला पुढें येतील इतर वरकड गोष्टीची विचारपूस करण्याकरिता आपल्या सेवेसी **अहमद अलीखान** यास पाठविलें आहे आपली मर्जी असल्यास या गोष्टीचा निकाल करून तावडतोब खबर यावी. म्हणजे त्याप्रो आनचेकडुन देखरेख केली जाईल. वरकड मजकूर मशारनिलेच्या जबानीवरून लक्ष्यांत येईल. जास्त काय तसदी देऊं ? नेहेमा सुखाचा काल असो.

---

पत्रांक १३१ ॥ श्री ॥ वलंद बताप जनरल

शके १७१२ १७९० इ.

**मल्हारराव होळकर** यास—विशेष—( जनरल मूसी बेल यांनी मल्हार-रावास पाठविलेल्या पुढील पत्राप्रमाणेंच मजकूर आहे ).

---

पत्रांक १३२ ॥ श्री ॥ जनराल मूसी बेल्.

१७९० इ.

***मल्हारराव होळकर** यांस—विशेष— हल्लीं **टिपुसाहेबांशीं** आमचा तह ठरला आहे की, रुपयापैकी सहा द्यावेत. परंतु आमची तबियत सदरहु साहेबाशी जुळत नाही. म्हणून माझा फार हेतु आहे कीं, जर मेहरबान **सवाई माधवरावसाहेब** यांच्याशी योग घडून येईल तर एकमेकांच्या एकीनें त्याच्या ताब्यांतील मुलुख आपल्या कबजात घेऊन आनंद करू. यापूर्वी याच बाबतीत आपणा परस्परांचें सवालजबाब होऊन असें ठरलें आहे की, जो मुलुख व मालमत्ता आपल्या ताब्यांत येईल त्यांपैकी तीन हिस्से श्रीमंत **रावसाहेबांनीं** घ्यावे व एक चवथा हिस्सा माझ्याकडे द्यावा. याबद्दल पत्रव्यवहार दोहोंकडे आहेच. व याकरितां **अहमद अलीखान** यांस आपल्या सेवेसी पाठविलें आहे. आपल्या मर्जीस आल्यास लवकर खबर द्यावी म्हणजे त्या बाबतीत खटपट करू. बहुत काय लिहिणे, नेहेमी सुखी असा.

---

पत्रांक १३२ ॥ श्री ॥ जनराल मूसी बेल्.

शके १७१२ १७९० इ.

**रावसाहेब परशरामभाऊ** यांस—( मल्हारराव होळकर यांस लिहिलें आहे त्याचप्रमाणें सर्व मजकूर आहे ).

---

पत्रांक १३३ ॥ श्री ॥ कॉर्नवॉलिस्

शके १७१३ श्रावण व० १० पा। २४।८।१७९१ इ

**श्री० माधवराव नारायण पंडित प्रधान** यांस— विशेष— आपण व **नबाब आसफजहा** बहादर व **इंग्रज** बहादर यांमध्यें परस्पर कौलकरार झाल्या-

---

* येथें लिफाफ्यावरील पत्त्यावरील हे नांव चुकीचें दिसतें. कारण मल्हारराव होळकर हे ता० २०।५।६६ रोजी वारले व शिक्क्यावरील सन ११९० हि० असा आहे.

पासून आजपावेतों तो पाळण्यामध्यें माझा पूर्ण हेतु आहे व तें माझें आद्य कर्तव्य समजत आहे व पुढेंहि तसेंच समजेन. ही तिघांची परस्पर एकी ईश्वरदत्त आहे. या बाबतीत सर्व गोष्टींची व्यवस्था लावण्याचे काम कंपनी अंग्रेजसरकारांनी माझ्यावर सोंपविलेले आहे. सबब ही व्यवस्था इतकी उत्तम करण्याचें माझ्या मनात आहे की, आपण कंपनीसरकार व नबाबसरकार या तिघाच्या बाबी-अब्रू, मोठेपणा व फायदा-या संशयास्पद न ठेविता उघडपणें दाही दिशाभर जाहीर करीन. टिपुसुलतान यांजकडून मजकडे वकील पाठविण्याबद्दल [illegible] मेंची व की [illegible] विषय
मॅलेट्साहेबामार्फत आपणास कळे
नाही. कारण ही बाब करारामध्यें
विजयी फौज हरि पंडित तात्
फौजेस मिळाली. सदर पंडितसाहेब
चिंतक आहेत. आपण त्यांस विज
त्याच्या ठिकाणी असलेला आपला विश्वा
व चातुर्य प्रत्येक कामांत दिसून येतें. पर
कडून आलेल्या विनंतिबद्दल ते विशेष वि
सरकाराच्या बाबतीत टिपुसुलतानाचा क
विण्यात ते गुंतलेले आहेत. दुसऱ्या पक्षास ही
तपासात आहेत. या सर्व गोष्टीचा त्यांनी छडा ल
रांच्या विश्वासूक माणसांस एकत्र करून जें त्या
ठरविले. त्यास अनुसरूनच मी शांतचित्तानें दुसऱ्या
वकील या तीन सरकाराच्या बाबतीत बोलण्याकरित
टिपूसुलतानानें या तिघाच्या नावें पत्रें लिहिलेली अ
पाठवून दोस्तीचा पाया मजबूत करण्याबद्दल विनती
पत्राचे उत्तरी त्यास ही गोष्ट कबूल आहे. तिन्ही सरका
क्षणोक्षणी माझ्यापुढें आहे याबद्दल आपण खात्री ठेव
शिवाय व दुसरा पक्ष नबाबमजकूर यांचे हेतु समजल्याशि
बाबतीत काम तहकूब ठेवून बोलणेंचालणें करणार नाही. तात
बद्दल माझें सलबत चालत असतें. वरकड मजकूर, तात्या
वरून व मिस्तर मॅलेट् साहेबांच्या जबानीवरून आपण
काय लिहिणें ?

ब

**पत्रांक १३४** **॥ श्री ॥** **मॉर्गन्**

शके १७१९ १७९७ इ.

**मे० नानासाहेब बाळाजी पंडतः—**

यांस—आपलें खुषीचे पत्र मिळालें. **श्रीमहाराजहुजूरकडून** पोषाख, शिरपेच, झगा भरगच्ची, हत्ती व तरवारीची मूठ हे मिळाल्याबद्दल लिहिलें तें समजून फार आनंद वाटला. ईश्वर आपणास ही गोष्ट धारजिणी करो, व जवळ दूरच्या स्नेह्यास सुखी करो. मी नेहमी ईश्वरास आपल्याकारिता हात जोडून प्रार्थना

—ची

**मॅक्लिऑड्**

ता. (?)

यांस—विशेष—आपलें कृपापत्र पावलें

ी असलेलें माझे प्रेम व एकी अगदी उघड

करीत नाही. आपणां परस्परात ज्याअर्थी

ह्याप्रमाणेंच असला पाहिजे. कारण परस्पर

पण आपलें कुशलवृत्त नेहेमी पत्री कळवून कृपा

याप्रमाणें वाटेंत अडथळा न व्हावा म्हणून कपनीच्या

ह. पोंचेल. आपल्या मातोश्री आनंदाने व सुख-

तील. कारण खरेपणात व सरळपणांत **इंग्रज** सर-

ई आपणांस चांगलें माहीत आहेच. आपल्या मातो-

ची जबाबदारी सर्व माझ्यावर आहे. वरकड गोष्टी

तील. जास्त काय तसदी घावी. कळावे.

**मॅक्लिऑड्**

---

**॥ श्री ॥** (?)

ता० ( ? )

कंपनी **अंग्रेज बहादर** याच्या मायन्यांत असे नांव व पदवी

**अंगरेज बहादर** याचे नोकर कलकत्याचे **गवर्नर बहा-**

गोष्ट लक्षात घेऊन जे लिहिणें असेल तें लिहावे. **बहुत** कष्ट